हें पुस्तक

अनेक इंग्रजी व मराठी ग्रंथांच्या आधारें ट्रेनिंग-कालेजांतील विद्यार्थी व इतर मराठीवाचक यांकरितां,


गुंडो नारायण मुजुमदार,

हेडमास्तर

ट्रेनिंगस्कूल कोल्हापूर, यांनीं रचिलें,


तें





कोल्हापूर येथें

'विद्याविलास' छापखान्यांत छापिलें.

सन १८८८ इसवी.

TO

# KHAN BAHADUR MEHERJIBHAI KUVARJI,

DEVAN OF KOLHAPUR, AND PRESIDENT OF THE

COUNCIL OF ADMINISTRATION,

THIS WORK IS DEDICATED

In token of respect and esteem.

BY THE AUTHOR.

मेहेरबान खानबहादूर मेहरजीभाई कुवरजी

कोल्हापूर संस्थानचे दिवाण, व कौन्सिल आव्

ऑड्मिनिस्ट्रेशनचे प्रेसिडेंट,

यांस

हा ग्रंथ

सन्मान व सत्कारपूर्वक

ग्रंथकर्त्यानें

नजर केला असे.

# प्रस्तावना.

सन१८८६ च्या नवीन ट्रेनिंगकालेजकोडाप्रमाणें सदर पाठशाळेतील अभ्यास क्रमांत या अर्थशास्त्राचा समावेश झाला, ही मोठ्या महत्वाची गोष्ट समजली पाहिजे. कारण या शास्त्राच्या अभ्यासापासून इंग्लंडवगैरे राष्ट्रांची अल्पकाळांतच भरभराटी झाली, व आणखीही होत आहे. परंतु एवढ्या मोठ्या व सुपीक अशा या देशांत त्या शास्त्रसंबंधीं कांहींच हालचाल नाहीं, ही मोटी देशहानीचीच गोष्ट समजली पाहिजे. नवीनकोडाप्रमाणें अभ्यास सुरू करितांना सकृद्दर्शनीं या मुख्य मूलतत्वप्रतिपादक अशा अर्थशास्त्रसंबंधीं पुस्तकाचा आभाव आहे, ही मोठी अडचण दिसून आली. येणेंकरून केवळ विद्यार्थी जनांचीच गैरसोय नसून सर्व मराठी वाचकांचीही मोठी गैरसोय आहे. यामुळें या शास्त्राची चर्चा कुंठित झाली आहे. ती उणीव दूर करावी, व या शाळेंतील विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम सुरळीत चालावा, या हेतूनें हें पुस्तक तयार करण्याचा हा ग्रंथकारानें प्रथम प्रयत्न केला आहे, या प्रथम प्रयत्नाचें फल ट्रेनिंगकालेजांतील विद्यार्थी, मराठीशिक्षक व इतर मराठी रसिक वाचक यांस ग्रंथकारानें मोठ्या प्रेमभावानें अर्पिलें आहे. ∴ हा पहिलाच प्रयत्न वलौकर पुस्तक मिळून, येथील अध्यापक शाळेचा अभ्यास सुरू होण्याविषयीं ग्रंथ तयार करण्याचे कामीं झालेली गडबड व ग्रंथकाराचें ज्ञान, अनुभव, धैर्यादि पुस्तक रचण्यास लागणारे गुण बाताबेताचेच असल्यामुळें, सदर पुस्तकांत दोष राहणें संभवनीय आहे. तथापि होनां होईपर्यंत दोष न राहण्याची खटपट करण्यांत आली आहे. परंतु (भुकेस कोंडा) या प्राकृत म्हणीतील तात्पर्याप्रमाणें केवळ ग्रंथाभावापेक्षां साधारण कां असेना; परंतु कांहीं तरी साधन झालें हें बरें, असें रसिक जनांच्या मनांत येईल, असें ग्रंथकारास जें वाटतें, त्यांत कांहीं अन्यथा नाहीं. तथापि सुदैवानें दुसरी आवृत्ति निघण्याचा प्रसंग आल्यास रसिकजनांकडून दाखविलेल्या दोषांची सुधारणा मोठ्या मनोभावें करण्यांत येईल.

या कामीं येथील राजारामकॉलेजांतील अर्थशास्त्राभिज्ञ अ० प्रोफेसर रावसाहेब हरीपंत अण्णा गोडबोले यांणीं तयार झालेलीं प्रकरणें मोठ्या काळजीनें वाचून वेळोवेळीं मोठ्या महत्वाच्या सुचना केल्या त्यांपासून ग्रंथकारास मोठी मदत झाली. याबद्दल ग्रंथकर्ता हा कृतज्ञता बुद्धीनें त्यांचे आभार मोठ्या संतोषा-

नें मानितो. तसेंच तयार झालेलीं प्रकरणें लिहिण्याचे कामीं या शाळांतील शिक्षक व विद्यार्थी यांणीं फार मदत केली; या साठीं हा ग्रंथकर्ता त्यांचा आभारी आहे.

लेडीफासेट, जेव्हन्स, फासेट, अर्थशास्त्रपरिभाषा व गणपुले इत्यादि पुस्तकांतून माहिती घेतली आहे; यासाठीं त्यात्या ग्रंथकारांचा हा कृतज्ञता बुद्धीनें आभार दर्शविण्यास तत्पर आहे.

या ग्रंथास आरंभ करण्यापूर्वी आपले लोकप्रिय व गुणज्ञ मे॰ रा॰ बाळशास्त्री पंडित डे॰ ए॰ इन्स्पेक्टर व ट्रेनिंगस्कूलचे मूळ उत्पादक, पोषक व पूर्ण अभिमानी यांना अशा ग्रंथाभावामुळें या अध्यापक पाठशाळेतील विद्यार्थ्यांची गैरसोय दिसून आली ती दूर व्हावी या हेतूनें त्यांच्या अनुज्ञेवरून, हें पुस्तक अनेक इंग्रजी व मराठींत उपलब्ध असलेल्या ग्रंथाधारें रचण्यांत आलें आहे.

या ग्रंथाचा या इलाख्यांतील प्रजाजनांमध्यें प्रसार करण्याचे यत्न रा॰ ब॰ साहेब पंडित व नवीन येणारे रावसाहेब कीर्तिकर यांजकडून होऊन (आम्राश्च सिक्ताः पितरश्च तृप्ताः) या न्यायानें ग्रंथकर्त्यास उत्तेजन व लोकांत या पुस्तकाच्या प्रसारानें अर्थशास्त्राची ज्ञानवृद्धि हे दोन्ही हेतु एक समयावच्छेदें करून सिद्धीस नेले जातील, अशी ग्रंथकर्त्यास मोठी उमेद आहे. व या स्तुत्य ज्ञानवृद्धीचे कामीं करवीर दरबाराकडून इतर ग्रंथकाराप्रमाणें उदार आश्रय मिळून, येथील दरबारचे ग्रंथोत्तेजनाविषयीं सतत जगविश्रुत असलेल्या औदार्याचा अनुभव या दरबारच्या सेवेस तत्पर असलेल्या या ग्रंथकारासही मिळेल. अशी पूर्ण आशा आहे. याचप्रमाणें इतर रसिक व उदार लोकही करतील, यांत शंका नाहीं.

जगच्चालक परमेश्वराच्या कृपेनें हें काम अल्पकाळांत तडीस गेलें, यासाठीं त्याची प्रार्थना करून, या पुस्तकाच्या योगानें निदान या महत्वाच्या शास्त्राविषयीं लोकांस जिज्ञासा जागृत होवो, व अर्थशास्त्रसंबंधीं अज्ञानाचा नाश होऊन, यापेक्षां जास्त विस्तृत अशा अर्थशास्त्राच्या पुस्तकाची आवश्यकता असल्याची शुभवार्ता ईशकृपेनें या ग्रंथकर्त्याच्या कानीं येवो. म्हणजे आपल्या श्रमाचें सार्थक झालें, असें त्यास वाटेल, व तसें होण्यास ईश्वराची प्रार्थना करून हें लांबलेलें प्रस्तावनाप्रकरण येथें संपवितों.

---

## प्रकरण २ रें.



## प्रकरण ३ रें.



## किरकोळ प्रकरण.







**शास्त्राध्ययन प्रथम बिकट वाटतें-** ज्यांचे कोणत्याही एकाद्या शास्त्रामध्यें परिश्रम झाले आहेत त्यांना त्या शास्त्रसंबंधीं मूलतत्वप्रतिपादक जे आरंभीं कांहीं भाग असतात त्यांची समजूत होतांना किती क्लेश व अडचणी सोसाव्या लागतात, याचा अनुभव त्या सर्वांस आलेलाच आहे पहा कीं, यंत्रशास्त्रांतील गतिविषयक जे मूल सिद्धांत आहेत त्यांच्या दुर्बोध प्रतिज्ञा, व त्या व्यक्त होण्यासाठीं जें स्पष्टीकरण केलेलें असतें, त्याची समजूत होणें हें मूळारंभीं किती कठीण पडतें हें विश्रुतच आहे हीच गोष्ट गणितवगैरे शास्त्रांस व अर्थशास्त्रासही लागू पडते.

अर्थशास्त्राची व्याख्या, व ज्या पद्धतीनें या शास्त्रांतील विषयाची चिकित्सा करावी लागते ती पद्धत, आरंभीं अवलोकनांत येतांच अर्थशास्त्राचा अभ्यास करूं इच्छिणाऱ्यांस मोठें कठीण वाटून ते घोंटाळ्यांत पडतात. यास्तव अशा जिज्ञासु प्रारंभकांकरितां हा लहानसा ग्रंथ तयार केला आहे. यांत या शास्त्रांतील अत्यंत महत्वाचें व मनोरंजक अशा मुख्य तत्वांचें प्रतिपादन जितकें होणें शक्य आहे तितकें सुबोध करण्यांत आलें आहे. यास्तव तें सामान्यसमजुतीच्या वाचकांसही कळण्यास कठीण पडणार नाहीं. हीं मुख्य मूलतत्वें वाचकांस समजूं लागल्यानें या शास्त्राचें खरें स्वरूप चांगलें व्यक्त होऊन त्याचें महत्व त्यांच्या सहज ध्यानांत येईल.

**अर्थशास्त्रावरील आरोप व त्याचें निरसन-** या शास्त्रांत केवळ संपत्तिविषयक प्रतिपादन केलें आहे; परंतु संपत्तिपेक्षांही अत्यंत महत्वाच्या अन्य गोष्टी आहेत जसें सत्य, नीति, औदार्य, सद्गुण, स्वदेशाभिमान अशा विषयांचें यांत कांहींच प्रतिपादन नाहीं. यास्तव ज्या ग्रंथांमध्यें या विषयांचें प्रतिपादन केलेलें असेल ते ग्रंथ वाचणें जास्त हितावह होईल. कारण सत्यादि वर निर्दिष्ट केलेल्या गोष्टींच्या संपादनानें मनुष्याच्या वर्तणुकींत सुधारणा होऊन तो मोठा उदार आणि महात्मा होतो परंतु या शास्त्राच्या अ-





ध्ययनापासून सर्वांनीं धनसंचयच करीत असावा असें ज्ञान झाल्यानें ते कठोर होऊन त्यांच्या आंगीं आपलपोटेपणा हा दुर्गुण जडतो, असे ठरीव दोषारोप या शास्त्रावर अर्थशास्त्रानभिज्ञ लोक करितात हा अज्ञानमूलक व परंपरागत असा जो त्यांचा ग्रह होत आला आहे तो चुकीचा आहे; हें स्पष्ट होण्यासाठीं त्या चुका या ग्रंथांत उघडकीस आणिल्या आहेत. तथापि येथें सामान्यत्वें करून वाचकांची खात्री व्हावी या साठीं इतकेंच सांगतों कीं, अर्थशास्त्रवेत्ता हा आपल्या ज्ञानानें आपल्या देशबांधवांची स्थिति सुधारण्यास व देशोन्नति करण्यास कारणीभूत होतो म्हणून जे अत्यंत परोपकारी व महात्मे असे लोक आहेत त्यांमध्यें हा श्रेष्ठ आहे. असें निर्विवाद ठरतें. कारण देशाच्या कल्याणास नियामक अशा कांहीं ठरीव सिद्धांतांचे ज्ञान असल्या वांचून केवळ तें करण्याची इच्छा असणें हें निरर्थक होय, व अशा इच्छेनें झालेले जे प्रयत्न त्याचा परिणामही अन्यथा होतो.

वरील उपपादनाच्या सत्यतेस फार प्राचीनकालापासून गैर समजुतीनें 'स्वर्गद्वारकपाट पाटनपटुः' अशा प्रकारचा मानिला गेलेला जो धर्म हें योग्य उदाहरण आहे. पहा धार्मिकलोक धर्म करितात या योगानें भिक्षा मागणारांची संख्या वाढते. ते लोक या योगें निरुद्योगी, अदूरदर्शी व आळशी होतात आणि या मुळें देशामध्यें दारिद्र्य वाढत जाऊन गुन्हेही फार घडतात सबब अशा अविचाराच्या धर्मापेक्षां जेणें करून लोक सुशिक्षित होतील, व आपला वृद्धापकाळ सुखानें घालविण्यास समर्थ होतील अशा तजविजींमध्यें त्यांनीं आपल्या द्रव्याचा व्यय करावा म्हणजे तोच खरा धर्म होईल व येणेंकरून वरील धर्मात्म्यांच्या केवळसद्वासनेंमुळेंच परंतु अविचारमूलक अशा धर्मापासून घडणारे जे वरील अन्यथा परिणाम ते टळतील.

**अर्थशास्त्राची व्याख्या-** 'ज्या तत्वांनीं संपत्तीचें उत्पादन, वांटणी आणि विनिमय यांचें नियमन होतें त्या तत्वांचें प्रतिपादन ज्या शास्त्रांत केलेलें असतें त्यास **अर्थशास्त्र** म्हणतात.'

**संपत्ति म्हणजे काय-** जें कांहीं विनिमयार्ह, परिमित व उपयोगी, असें असतें त्यास **संपत्ति** म्हणतात, आतां संपत्तीच्या ह्या तीन गुणांपैकीं प्रत्येकाचें विवरण अनुक्रमें करूं.

**विनिमयार्ह म्हणजे काय-** विनिमय म्हणजे अदलाबदल. आपल्या जवळचा पदार्थ दुसऱ्यास देणें व दुसऱ्या जवळचा आपण घेणें. अशी अदलाबदल ज्या पदार्थाची करितां येते ते पदार्थ विनिमयार्ह होत. जसें घड्याळ, पुस्तक, वस्त्रप्रा-

वर्ण इत्यादि. कांहीं पदार्थांचा विनिमय दस्तऐवज वगैरे कागदांनीं कायदेशीर रीत्या होतो. जसें घर जमीन वगैरे. सेवा किंवा चाकरी यांचाही विनिमय करितां येतो. जसें एखाद्या गवयास पैसे देऊन गाणें ऐकतां येतें, एखाद्या सशक्त मनुष्याच्या शक्तीचा उपयोग करून घेतां येतो, त्याचप्रमाणें हरिदास, पुराणीक ह्यांच्या कलेचा उपयोग करून घेतां येतो.

**परिमित कशास म्हणावें**– आतां दुसऱ्या लक्षणाविषयीं विचार करूं. पदार्थ परिमित असल्यावांचून त्याला संपत्ति म्हणतां येत नाहीं. विपुल मिळणाऱ्या पदार्थांस संपत्ति म्हणत नाहींत. उदाहरण हवा ही अपरिमित आहे यास्तव ती संपत्ति नव्हे. म्हणून कोणतीही वस्तु परिमित असल्याखेरीज तिला संपत्ति म्हणतां येत नाहीं.

तसेंच सूर्यप्रकाश ही संपत्ति नव्हे. हिऱ्याची किंमत जरी फार आहे तरी त्याचा उपयोग थोडा आहे. त्याचे उत्तम अलंकार होतात. व कांच कापण्याच्या कामीं त्याचा उपयोग होतो आतां त्याचा उपयोग थोडा असून त्यास किंमत फार पडते याचें कारण तो दुर्मिळ आहे आतां जो पदार्थ दुर्मिळ असतो तो मौल्यवान् असेल असा मात्र नियम नाहीं. उदाहरण अशा कांहीं धातु आहेत कीं, त्या अगदीं दुर्मिळ आहेत परंतु त्यांस कोणी किंमत देत नाहींत कारण त्यांचा उपयोग नाहीं. ह्यावरून कांहीं उपयोग असल्यावांचून अशा पदार्थांस मौल्यवान् म्हणतां येणार नाहीं. इरिडिअम म्हणून एक धातु आहे त्यास किंमत फार पडते. कारण सोनेरी लेखण्यांचीं टोकें करण्यास त्याचा फार उपयोग होतो व तो फार दुर्मिळ आहे, तथापि एवढ्यावरून त्यास मौल्यवान् म्हणतां येत नाहीं.

**उपयोगी म्हणजे काय**– जी प्रत्येक वस्तु संपत्तीचा भाग आहे असें आमच्या नजरेस येतें ती मध्यें उपयोगी पडण्याचा गुण असला पाहिजे. उपयोगीं असणें म्हणजे जेव्हां नड पडेल तेव्हां तिच्या योगानें ती नड भागावी. उदाहरण तंबोरा वगैरे लावून चांगल्या गवयानें उत्तम गायन केलें तर सुख होतें, तसेंच उत्तम तंतुवाद्यानें सुख होतें, अन्नापासून क्षुधा निवारण होते. म्हणून अन्न हें सुखद होय. एखाद्या वस्तूपासून जसजसें दुःख निवारण व सुखवृद्धि होईल तसतशी ती वस्तु उपयोगीं आहे.

वस्तु साक्षात् उपयोगी असो किंवा परंपरेनें उपयोगी असो, कोणत्याही तऱ्हेनें ती उपयोगीं असली म्हणजे झालें. वस्त्रें ही साक्षात् उपयोगीं आहेत, कापूस

व वस्त्रें विणण्याचे माग यंत्रें वगैरे हीं परंपरेनें उपयोगीं आहेत. अन्न हें साक्षात् उपयोगी आहे, व तें शिजविण्याचीं भांडीं हीं परंपरेनें उपयोगीं आहेत. बसण्याची गाडी, रथ, आदिकरून वाहनें हीं साक्षात् उपयोगीं आहेत, लदाऊ गाडी ही परंपरेनें उपयोगी आहे. या वरील उदाहरणांवरून साक्षात् व परंपरेनें उपयोगी म्हणजे काय? हें वाचकांस समजलें असेल. ज्या वस्तूंपासून प्रत्यक्ष सुख मिळतें, त्या वस्तु साक्षात् उपयोगीं होत; व त्या वस्तु उत्पन्न करण्यास ज्या वस्तूंची आवश्यकता असते त्या वस्तु परंपरेनें उपयोगीं होत. हा वरील सूक्ष्म भेद हरएक ठिकाणीं समजणें कठीण पडतें.

**केवळ पैका ही संपत्ति नव्हे**- पैकाच संपत्ति अशी लोकांची समजूत झाल्यापासून राज्यनीतींत व लोकनीतींत लोकांच्या भलभलत्या समजुती पडून गेल्या होत्या; व सांप्रतकाळींही कित्येक लोकांस त्या खऱ्या वाटत आहेत. स्वदेशांतून परदेशांत पैसा जाऊंनये व परदेशांतून स्वदेशांत जितका येईल तितका आणावा. हें धोरण धरून पूर्वीचे मुत्सद्दी लोक कायदे करणें ते करीत. निरनिराळीं मनुष्यें किंवा निरनिराळे देश परस्परांशीं व्यापारादि करून जें धन संपादन करितात. तें आपण मिळविलेल्या संपत्तीच्या मानानें दुसऱ्या मनुष्यांस किंवा देशास भिकारी केल्यावांचून होत नाहीं. असें प्राचीन लोक समजत. त्यांस असें वाटे कीं, जो आपणास सधन करितो. तो त्याच उपायांनीं परंपरेनें लोकांस दरिद्री व दरिद्रद्वारा दुःखी करितो. असें आहे. यास्तव आपणास लोकहितकर्ता असें म्हणविणाऱ्या पुरुषानें व्यापारादि कदापि करूंनये परंतु या सर्व समजुती भ्रांतिमूलक होत. हें आतां लौकरच वाचणाऱ्यांस समजून येईल.

आतां कोणी असें म्हणेल कीं, 'द्रव्येण सर्वे वशाः' या न्यायानें देशांत द्रव्य असलें म्हणजे त्याच्या पोटीं सर्व गोष्टी येतातच. म्हणून आम्हीं द्रव्यास संपत्ति म्हणतों. तर त्यानें असें मनांत आणावें कीं, पैसा दिला म्हणजे जी पाहिजे ती गोष्ट प्राप्त होते. यास्तव आपणाजवळ पैसा जसजसा अधिक होईल तसतसें आपणास उपभोग्यपदार्थ मिळविण्याचें अधिक सामर्थ्य येईल. ही गोष्ट केवळ एक मनुष्यास लक्षून पाहिली असतां खरी आहे परंतु सर्व देशाचे अनुरोधानें पाहिली असतां खरी नाहीं. एकच मनुष्यापाशीं अधिक पैसा होत गेला तर त्यांचे उपभोग्यपदार्थ घेण्याचें सामर्थ्य वाढेल खरें परंतु देशांतील सर्व मनुष्यांजवळ जर पैसा वाढत गेला तर पैशाचा अधिक पुरवठा होऊन त्याची किंमत उतरून उपभोग्य पदार्थ घेण्याचें कोणाचेंही सामर्थ्य वाढावयाचें नाहीं. पैसे, रुपये,

मोहरा वगैरे हीं नाणीं सर्वत्र चालणाऱ्या अशा केवळ चिल्या होत. आणि सगळ्या देशांत पैशाची वृद्धि करणें म्हणजे मोठमोठ्या कागदांवर चिठ्या लिहिणें असेंच होय. ह्यावरून स्पष्ट कळतें कीं, सर्व देशांत पैसा जास्त किंवा कमी झाला असतां त्या पैशानेंच स्वतः देशाचा उत्कर्ष किंवा अपकर्ष कांहींच व्हावयाचा नाहीं; ह्या वरच्या विचारावरून दुसरी अशी एक गोष्ट कळते कीं, पैसाच कायतीसंपत्ति अशी भ्रांति पडल्यामुळें जो तोटा झाला तो एकाचाच झाला नाहीं. तर सर्वांचाच झाला, तसेंच एकास लक्षून अत्यंत महत्वाची जी गोष्ट असते ती सर्व देशाच्या संबंधानें पाहिली असतां अत्यंत क्षुल्लक असते.

---

# भाग २ रा.

# संपत्युत्पादन.

**संपत्तीचे उत्पादनास अवश्य लागणारीं तत्वें**— कोणत्याही उद्योगामध्यें प्रथम गोष्ट म्हटली म्हणजे आपणास कशाची गरज आहे ह्याचा निर्णय करणें ही होय. नंतर ती संपादन करणें किंवा उत्पन्न करणें, आणि ती अत्यंत कमी श्रमानें कशी उत्पन्न होईल हें पाहणें ह्या संबंधानें आपणांस तीन आवश्यक तत्वांचा विचार करणें जरूर आहे तीं तत्वें खालीं लिहिल्या प्रमाणें—

**१ जमीन, २ श्रम, ३ भांडवल.**

संपत्युत्पादनामध्यें हीं तीन तत्वें एक समयावच्छेदें करून येतात आपण जमिनीवर श्रम करितों आणि जे लोक श्रमामध्यें गुंतलेले असतात. त्यांच्या निर्वाहास व त्यांस लागणाऱ्या हत्यारांकडे भांडवलाचा उपयोग होतो. वरील तीनही तत्वांचा अनुक्रमें विचार करूं.

**१ जमीन— अथवा द्रव्याचें मूलस्थान**— जेव्हां आपणास संपत्ति उत्पन्न करावयाची असते, तेव्हां कांहीं जमीन किंवा एखादें सरोवर, अथवा समुद्र अथवा नदी ह्यांतून संपत्तीस लागणारें द्रव्य आपण काढितों. मग तें द्रव्य खाणींतून नदींतून किंवा महा सागरांतून मिळो, कोठूनही मिळालें तरी चिंता नाहीं. धान्यें व फळफळावळहीं जमिनीपासून उत्पन्न होतात. वस्त्रांस लागणारे (जिन्नस जे कापूस रेशीम ताग वगैरे) ते जमिनीपासून उत्पन्न होतात. धातु व इतर खनिजपदार्थ खाणीपासून मिळतात. तसेंच नद्या, समुद्र, महासागर ह्यांजपासूनही आ-

म्हांस द्रव्यें कमी मिळतात असें नाहीं; त्यांजपासून मासे, तेल, व्हेलमाशाचें हाड, सीलमाशाचें कातडें इत्यादिपदार्थ प्राप्त होतात. मूळ द्रव्य कांहीं तरी असल्यावांचून दुसरा कोणताही जिन्नस आम्हांस उत्पन्न करितां येत नाहीं. टांचणी करावयाची असलीस तांबें, जस्त, कथील, हे जिन्नस मिळवावे लागतात. दाल करावयाचा असल्यास रेशीम व रंगाचीं द्रव्यें मिळवावीं लागतात. जी प्रत्येक गोष्ट आपण उपयोगांत आणितों. म्हणजे खातों, पितों, इत्यादि. यांत लागणाऱ्या वस्तु ज्या द्रव्याच्या असतात, तीं मूळद्रव्यें मिळविण्याविषयीं आपण निरंतर उद्योग करीत असावें.

सामान्यतः द्रव्यावांचून इतर गोष्टींची जरूर लागते. मूळद्रव्यें तिकडून इकडे व इकडून तिकडे नेण्या आणण्यास व पदार्थ बनविण्यास शक्तीचा उपयोग पडतो. स्वभावतः आपले अवयव न दमावेत म्हणून धान्य दळण्यासाठीं पवनचक्या, माल नेण्यासाठीं गलबतें, आगबोटी व बाकीचे जिन्नस उत्पन्न करण्यास यंत्रें वगैरे साधनें उत्पन्न करितों. सृष्टीपासून संपत्तीचीं साधनें, व त्या साधनांस संपत्तीचें रूप देण्यास लागणारी शक्ति हीं प्राप्त होतात. कोणतीही वस्तु उत्पन्न करण्यास लागणारीं जीं मूळद्रव्यें आम्हांस सृष्टीपासून आयतीं मिळतात. त्यांस **नैसर्गिकद्रव्यें** म्हणतात. नैसर्गिकद्रव्यांमध्यें जमीन हीच अत्यंत महत्वाची आहे. कारण विपुल सूर्यप्रकाश व पाणी यांचा पुरवठा झाल्यानें जिची लागवड चांगली होऊन आपणास सर्व प्रकारचीं पिकें तिजपासून मिळतात. जमिनीचें वर्णन केलें असतां त्यामध्यें नद्या, खडक ह्यांचा समावेश होतो. ह्या सृष्टीचा तीन चतुर्थांश भाग समुद्रानें व्यापिला आहे तरी त्या क्षारोदक भागापासून व्हेलमाशाचें हाड, सीलमाशाचें कातडें, कांहीं वनस्पति व इतर प्राणी यां खेरीज जास्त पुरवठा होत नाहीं म्हणून जेव्हां जेव्हां आपण जमिनीविषयीं प्रतिपादन करितों तेव्हां तेव्हां ती द्रव्याचें मूलस्थान आहे असा आशय असतो. असें समजावें.

**जमीन — द्रव्याचें मूलस्थान — नैसर्गिक द्रव्यें —**

**२ श्रम —** केवळ सृष्टपदार्थांस संपत्ति म्हणतां येत नाहीं हें अगदीं स्पष्ट आहे. अत्यंत सुपीक प्रदेशांत एखादा मनुष्य गेला परंतु त्या ठिकाणीं असणाऱ्या वस्तु आपल्या कामीं लावण्याचा श्रम त्यानें केला नाहीं, तर तेथें त्यास उपाशीं मरण्याचा प्रसंग येईल. झाडावर लोंबकळलेलीं फळें तोडण्याविषयीं जर तो श्रम न करील तर त्या फळांस संपत्तीचें रूप येणार नाहीं. रानांत भटकणारीं हरणें इत्यादि पारधीच्या ज-

नावरांपासून आपणांस अन्न प्राप्त होतें. तरी त्यांची पारध करून मांस शिजवावया-स श्रम करावे तेव्हांच आपणास तें अन्न प्राप्त होतें, सुखकारक वस्त्रें, घरें आणि अन्नहीं संपादण्याची इच्छा असल्यास पुष्कळ श्रम करावे लागतात, सारांश अशाप्रकारची द्रव्यें क्रमाक्रमानें संपादन करून तीं आपल्या उपयोगीं पडतील. असा त्यांच्या आकारांत व रूपांत फरक करावा लागतो. यावरून द्रव्याची विपुलताच असल्यानें संपत्ति प्राप्त होत नाहीं तर ती चातुर्यानें व निरालस्यपणानें श्रम केले असतां प्राप्त होते. उदाहरण- उत्तर-अमेरिका हा एक प्रदेश नैसर्गिक द्रव्यांनीं परिपूर्ण असतांहीं तेथील राहणारे इंडियन-लोक अगदीं दरिद्रावस्थेंत असत. कारण मूळपदार्थांपासून संपत्ति उत्पन्न करण्यास लागणारा परिश्रम आणि ज्ञान या गोष्टींचा अभाव असल्यानें त्यांची अशी स्थिति झाली. यावरून असें स्पष्ट होतें कीं, संपत्त्युत्पादनाविषयीं नियमित श्रम व चातुर्य यांची आवश्यकता आहे.

**भांडवल-** विपुल संपत्ति उत्पन्न करण्याविषयीं भांडवलाची आवश्यकता आहे भांडवलाच्या योगानें श्रम करणाऱ्या लोकांचा निर्वाह चालतो. मनुष्यांना दिवसांतून एक वेळ तरी विपुल अन्न लागतें. जर अन्नाचा अभाव असेल तर, तें जेथून प्राप्त होईल तेथून तें संपादन करणें जरूर आहे कारण तें नसेल तर त्यांच्याहातून श्रम होणार नाहींत. करितां अन्नासाठीं त्यांस झाडांचीं मुळें खणून काढावीं लागतात. रानांतील भक्ष्य जनावरें धरावीं लागतात, आस्ट्रेलियामध्यें राहणाऱ्या लोकांनीं दगडांच्या कुऱ्हाडीनें झाडें तोडावीं लागतात. यांस सोप्यारीतीनें अन्नवस्त्र संपादन करण्याविषयीं वेळ व सामर्थ्य हीं असत नाहींत.

आपल्यामध्यें एक सुंदर म्हण आहे कीं, 'तहान लागण्याच्या अगोदर विहीर खणावी.' या म्हणीप्रमाणें सर्वांनीं वागावें, हें योग्य आहे. त्याचप्रमाणें अति श्रमानें संपत्ति मिळविण्याच्या ज्या रीति आहेत त्यांमध्यें निर्वाह चालण्यासाठीं अन्नाची सामुग्री लागते याच अन्न सामुग्रीस आपण भांडवल असें म्हणतों. या भांडवलाच्या अभावामुळें लोकांनां नाना तऱ्हेचीं संकटें व उपाशीं मरण्याचा प्रसंग येतो. 'मिस-मार्टिनो' ग्रंथकर्त्रीनें केप ऑफ गुड होप येथें वसाहत करणाऱ्या लोकांची अन्नसामुग्री जंगली लोकांनीं चोरून नेल्यामुळें जी स्थिति झाली तिचें वर्णन केलें आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं, भांडवलाचा अभाव असल्यामुळें कोणताही धंदा होत नाहीं म्हणून प्रत्येकास भांडवलाची जरूरी किती आहे आणि त्यापासून आपला उपयोग कसा होतो हें समजतें यावरून भांडवल हें केवळ श्रमासाठींच नसून आ-

पल्या श्रमामध्यें काटकसर व्हावी व तें फलद्रूप व्हावें एतदर्थ त्याची जरूरी आहे, म्हणून त्यास संपत्तीच्या उत्पादनास मुख्य कारण मानीत नाहींत. उत्पादनाचीं आवश्यक तत्वें खाली लिहिल्याप्रमाणें—

मुख्य आवश्यक तत्वें ... ... ... सृष्टपदार्थ. श्रम.
गौण आवश्यक तत्वें ... ... ... भांडवल.

---

## भाग ३ रा.
## श्रम.

**श्रम हे अत्यंत उत्पादक कसे करावे—** मुख्य हेतु असा असावा कीं, श्रम हा होईल तितका जास्त उत्पादक होईल. म्हणजे थोड्या श्रमानें विपुल संपत्ति मिळेल अशी तजवीज करणें हें होय त्यासाठीं अशा रीतीनें श्रम होण्यास खालील गोष्टी अवश्य आहेत.

(१) अत्युत्तम वेळीं काम करणें.
(२) अत्युत्तम ठिकाणीं काम करणें.
(३) अत्युत्तम रीतीनें काम करणें.

**अत्युत्तम वेळीं काम करणें—** ज्या वेळेस कोणतींही कामें करणें सुलभ असते व आपल्या श्रमाला विपुल फल होण्याचा संभव असतो अशा वेळीं तीं कामें केलीं पाहिजेत. उदाहरण— ह्या देशांत धान्य पेरण्याची वेळ म्हटली म्हणजे मृगनक्षत्र होय. आतां एखादा शेतकरी जर त्या नक्षत्रानंतर दोन महिन्यानीं तेंच धान्य पेरील तर त्यास पाणी कमी मिळाल्यानें यावें तसें पीक येणार नाहीं. बरें मृग नक्षत्रापूर्वी महिनाभर तो तें पेरील तर मुळींच पाऊस न पडल्यानें त्याचें बीज करपून जाईल. व त्याची मेहनतही व्यर्थ जाईल. एतावता योग्य वेळेच्यापूर्वी काम केलें तरी नुकसान होतें व मागाहून केलें तरी नुकसान होतें. हीच गोष्ट शेत नांगरण्यास, मोगलण्यास, कापण्यास लागू पडते. वरील उदाहरणांवरून इतकें उघड होतें कीं, कोणतेंही काम कां असेना, तें ज्या वेळीं करण्याचें त्याच वेळीं केलें तर जितकें फायदेशीर होईल तितकें कोणत्याही वेळीं केलें तर होणार नाहीं पण, उलट एखादे वेळीं नुकसानकारकभाव होण्याचा संभव आहे. व यावरून असाही नियम निघतो कीं, जी गोष्ट ज्या वेळीं असतां अनायासानें होणारी आहे ती आज करण्याचे भरीस प-

ड्रूनये. त्या सारखा दुसरा चांगला नियम हा कीं, जी गोष्ट अनायासानें आज रोजीं होईल, ती उद्यांवर टाकूंनये. तथापि जी गोष्ट यथावेळीं करण्याची आहे, तो काल येईपर्यंत आम्हांस वाट पहावी लागते; सबब अशा वेळीं त्या मुदतीपर्यंत आम्हांस निर्वाहार्थ भांडवलाची जरूरी आहे.

**उत्तम स्थळीं काम करणें-** ज्यास काम करण्याचें आहे त्यानें तें काम कोणत्या स्थळीं केलें असतां चांगलें होईल, हें अगोदर पाहून त्यास योग्य स्थळ असेल त्याच स्थळीं तें केलें पाहिजे. वरील नियम पाहून कोणी असें म्हणेल कीं, अहो यांत तुम्हीं काय सांगितलें. वाळवंटांत धान्य अगर झाड कोणी लावील काय? अगर खडकावर कोणी धान्य पेरील काय? ज्या ठिकाणीं आपण केलेल्या श्रमाचें फळ होणार नाहीं त्या ठिकाणीं तो कधींही श्रम करणार नाहीं. आतां आपण याबद्दल एक उदाहरण घेऊं.- आपल्या इकडे कोंकणांत भात जसें चांगलें उत्पन्न होतें तसें देशांत कोठें होत नाहीं; व ज्वारी देशांत जशी चांगली होते, तशी कोंकणांत होत नाहीं. याचें कारण त्या त्या धान्यास ती ती जागा, हवा इत्यादि चांगली मानवतात. म्हणून अशी स्थिति असतां कोंकणांतील कोणी मनुष्य म्हणेल कीं यंदां आपण आपल्या शेतांत ज्वारी पेरूं तर तो खचीत बुडेल, यांत संशय नाहीं, त्या शेतांत ह्या धान्याचें पीक त्यास मुळींच मिळणार नाहीं. त्याच प्रमाणें देशांतील मनुष्य म्हणेल कीं, मी आपले शेतांत भात पेरीन तर त्याचीही वरच्याप्रमाणेंच स्थिति होईल, हें उघड आहे. तर सारांश काय कीं, ज्या ज्या पदार्थास जी जी जागा उत्पन्न होण्यास योग्य असेल, त्याच जागीं तो उत्पन्न केला पाहिजे.

जगांतील सर्व देशांनीं सुखी व्हावें व श्रीमान व्हावें अशी इच्छा असेल तर त्यास एक युक्ति आहे, ती ही कीं, ज्या ज्या देशांत जो जो माल अनायासानें उत्पन्न होण्यासारखा असेल, तो तो त्या त्या ठिकाणीं उत्पन्न करून बाकीच्या देशांतील लोकांस पुरवावा. उदाहरणार्थ- आपल्या येथें कापूस चांगला पिकतो परंतु चहा चांगला होत नाहीं, तो चीन-देशांत चांगला होतो, करितां आपण कापूस त्यास पुरवून तिकडून चहा आणिला पाहिजे. तसेंच आपल्याइकडे नीळ चांगली होते. त्याचप्रमाणें अफू उत्तम व पुष्कळ उत्पन्न होते, सबब तिची ज्यांस गरज आहे, असे जे चिनी लोक त्यास ती देऊन त्यांच्या तेथें अनायासानें होणारा माल इकडे आणिला पाहिजे. यावरून प्रत्येक देशांतील सरकारानें व लोकांनीं आपला व्यापार अप्रतिबंध ठेविला पाहिजे. व आपल्या येथें अनायासानें उत्पन्न होणारा माल पु-

फळ उत्पन्न करून तो दुसऱ्या देशास मोबदला देऊन तेथील विनिमयाई माल आणावा, हीच एक युक्ति जगांतील देश सुखी होण्यास चांगली आहे.

**कोणतेंही काम उत्तम रीतीनें करणें-** कोणत्याही ठिकाणीं कोणताही धंदा सुरू केला असतां आरंभिलेल्या कामांत चूक होऊं न देतां केलेले श्रम जेणें करून व्यर्थ न जातील अशा रीतीनें कामास सुरुवात करण्याविषयीं काळजी घ्यावी. एखादें काम करण्याच्या रीति अनेक असतात. त्यांतील उत्तम रीत जी असेल तीच हुषार व चतुर श्रम करणाऱ्यानें ग्रहण करावी. अथवा ज्यास त्या कामाचा अनुभव जास्त आहे त्याची सल्ला घेऊन त्या कामास सुरुवात करावी. ज्या श्रमविभागा विषयीं पुढील भागांमध्यें निरूपण व्हावयाचें आहे, त्या श्रम विभागामुळें ज्या मनुष्यास जें काम उत्तम रीतीनें करितां येतें, तेंच काम त्यानें करावें. तर मग उत्तम रीतीनें कामास आरंभ करण्यासाठीं खालील गोष्टींची अपेक्षा आहे.

## १ शास्त्र व २ श्रमविभाग.

**शास्त्राची आवश्यकता-** आरंभिलेल्या कामामध्यें यश चांगलें येऊन फायदा व्हावयासाठीं तो काम करणारा इसम वहिवाटलेला व चतुर असावा लागतो. एवढेंच नसून जो धंदा त्याणें आरंभिला आहे त्याच्या शास्त्रीयज्ञानाची त्यास माहिती असावी लागते. जसें सृष्टिशास्त्राच्या मूळ तत्वांची माहिती असली म्हणजे सृष्टपदार्थांपासून आपलीं कार्यें संपादन करण्यास किती सुलभ पडतें, हें आगगाडी, तारायंत्र इत्यादि कामें लक्षांत आणिलीं असतां सहज ध्यानांत येईल. शास्त्रीय ज्ञानापासून त्या धंद्यांत अज्ञानामुळें होणाऱ्या चुका दुरुस्त होऊन काम उत्तम रीतीनें होतें. जसें लोखंडाचे कारखानदार पूर्वीं असें समजत असत कीं; भात्यामध्यें थंड वारा भरून त्याच्या योगानें अग्निपेटवून लोखंडाचा रस करणें चांगलें. परंतु शास्त्रीय ज्ञानाच्या योगानें आतां असें समजून आलें आहे कीं, थंड वाऱ्याच्या ऐवजीं उष्ण हवेची योजना केल्यास काम पूर्वीपेक्षां चांगलें व सुलभ होतें. दुसरी गोष्ट अशी कीं, शास्त्रीयज्ञानाच्या योगानें त्या कामास फार थोडा वेळ लागून काम चांगलें होतें. जसें होडीवाला हा समुद्रास भरती ओहटी केव्हां येईल याची अगोदर चांगली माहिती करून घेतो, व भरती आल्या नंतर आपला प्रवास सुरू करितो. त्याचप्रमाणें समुद्रांत वारा कोणत्या काळीं कसा वाहतो, व कोणीकडे जाण्यास अनुकूल असतो, याची शास्त्रीय माहिती त्या भागांत असणारे लोक अगोदर करून घेतात, तें ज्ञान होण्यासाठीं त्यांनीं आपल्याजवळ त्याचे नकाशे बाळगिले-

असतात. दुसरें शास्त्रीय ज्ञानाच्या योगानें ज्या गोष्टी कधींही आमच्या स्वप्नांत देखील आल्या नाहींत त्या दृष्टी पडूं लागतात. उदाहरण आगगाडी, तारायंत्र, फोटोग्राफ इत्यादि पाहिली असतां समजेल. इंग्लंडातील धंद्यांत उत्तरोत्तर जी जास्त सुधारणा होत चालली आहे, त्या सर्वांचें कारण पाहूं लागलें तर शास्त्रीय ज्ञान वाढत चाललें आहे, हें होय. म्हणूनच सुधारणा झाली यांत संशय नाहीं.

श्रमावांचून संपत्त्युत्पत्ति होणें शक्य नाहीं असें मागें प्रतिपादन केलेंच आहे तथापि ज्यापासून कांहीं संपत्ति उत्पन्न होत नाहीं, असे कांहीं श्रम आहेत यामुळें श्रमाचे आतां दोन विभाग जाहले, ते असे. १ उत्पादक व २ अनुत्पादक ह्या उभय प्रकारांमध्यें असलेला भेद आपणांस समजतो, असें सर्व अर्थशास्त्राभिज्ञास वाटतें तें खरें नाहीं.

**उत्पादक व अनुत्पादक श्रमांविषयीं मतभेद-** कोणी ग्रंथकार श्रमापासून विनिमयग्राह्य असा कांहीं इंद्रियगोचर पदार्थ उत्पन्न झाल्यावांचून त्या श्रमास उत्पादक म्हणणें नीट नाहीं असें म्हणतात. आतां कित्येक दुसरे ग्रंथकार अनुत्पादक हा शब्द व्यर्थ, असें समजून ते असा पक्ष धरितात कीं, ज्या श्रमापासून आनंद किंवा दुःख निवारण इत्यादि इष्ट उद्देश सिद्ध होतात, त्या सर्व श्रमांस उत्पादक श्रम असेंच म्हणावें, त्यांस अनुत्पादक म्हणणें केवळ अन्याय आहे. वास्तविक पाहतां असा वाद उत्पन्न होण्याचें कारण उत्पादक व अनुत्पादक या दोन शब्दांचा अर्थ उभय पक्षकारांनीं निरनिराळा घेऊन ते भांडत आहेत असें वाटतें. पहिल्या पक्षाचे वादी वैद्य, न्यायाधीश, शिपाई, चाकर इत्यादिकांच्या श्रमास अनुत्पादक म्हणतात. कारण त्यापासून संपत्ति उत्पन्न होत नाहीं, तो श्रम व्यर्थ असें कोणी विचारी पुरुष म्हणणार नाहींत. कांकीं; या जगांत संपत्तीच एक मनुष्यास संपादनीय आहे असें नाहीं; ती खेरीज बहुत गोष्टी मनुष्यास संपादनीय आहेत. तेव्हां तसल्या गोष्टी ज्यांच्या श्रमानें सिद्ध होतात, असे जे वैद्य, न्यायाधीशप्रभृति यांच्या श्रमास व्यर्थ कोण म्हणेल.

आतां उत्पादक व अनुत्पादक श्रमांमध्यें जो भेद आहे तो समजण्यांत गोंधळ होऊं नये म्हणून आपण येथें मनुष्याच्या श्रमानें उत्पन्न होणाऱ्या इष्टधर्मांचे तीन प्रकार करूं.

**पहिला प्रकार-** श्रमानें मूर्त पदार्थांवर इष्टधर्म उत्पन्न होतात. ते धर्म लोहार, सुतार, शिंपी, साळी, शेतकरी वगैरे लोकांच्या श्रमांचीं कार्यें होत. हे

टक म्हटल्यास चालेल.

---

## भाग ४ था.

## श्रमसंयोग.

मागल्या भागांत श्रमाची उत्पादकता वाढविणारीं कारणें सांगितलीं; परंतु त्यावेळीं त्यांपैकीं एका मुख्य कारणाचें विवेचन केलें नाहीं; कारण तें फार मोठें आहे, व त्यांत पुष्कळ गोष्टींचा समावेश होतो, म्हणून त्याचें वर्णन ह्या निराळ्या भागांत केलें आहे. तें कारण श्रमसंयोग हें होय. अनेक श्रमकर्त्यांनीं एकत्र मिळून एक काम करणें त्यास **श्रमसंयोग** असें म्हणतात. ह्या श्रमसंयोगाचे दोन प्रकार आहेत ते—

अनेक मनुष्यें एकच काम परस्परांच्या सहाय्यानें करितात. हा पहिला प्रकार ह्यास **शुद्ध श्रमसंयोग** म्हणतात; व अनेक मनुष्यें एकाच कामाचे अंगभूत जे अनेक व्यापार ते करून तद्वारा एकमेकांस सहाय्य करितात; हा दुसरा प्रकार ह्यास **मिश्रश्रमसंयोग** असें म्हणतात. ह्या प्रकारासच बहुतेक अर्थशास्त्रकार **श्रमविभाग** असें म्हणतात. पहिल्या प्रकारांत सर्वांच्या श्रमाचें एकच कार्य होतें, व दुसऱ्या प्रकारांत त्यांच्या श्रमापासून अनेक अंगभूत कार्यें होऊन त्यापासून एक मुख्य कार्य होतें; हा त्या दोहों प्रकारांमध्यें भेद आहे.

असें म्हणतात कीं, दोन पारधी कुत्रे निरनिराळे धांवूं लागले असतां जितके ससे मारितात, त्यापेक्षां ते जमून धांवले असतां अधिक मारितात. तसेंच चार बायका निरनिराळीं जातीं घेऊन दळण्यास बसल्या असतां जितकें दळण दळतील त्यापेक्षां त्यांनीं एकत्र मोठ्या जात्यानें दळलें असतां अधिक दळण दळतील. ह्या उदाहरणांत शुद्ध श्रमसंयोगापासून होणारा लाभ दिसून येतो. तसेंच मोठमोठालीं ओझीं चढविणें, मोठालीं झाडें तोडणें, लांकडें करवतणें, वगैरे कामांत प्रत्येक मनुष्य एकटा काम करूं लागला असतां काम फार थोडें होईल, व कांहीं उदाहरणांत तर एकट्यानें काम मुळींच होणार नाहीं. जसें नाव वल्हवून नेणें, तारवाचें दोरखंड वर ओढणें इत्यादि पुष्कळ कामें अनेक मनुष्यांनीं एकत्र श्रम केल्यावांचून कदापि व्हावयाचीं नाहींत. न्यूहालंदांतील लोक उत्तर अमेरिकेंती-

ल इंदियन वगैरे रानटी लोक एकमेकांस सहाय्य करीत नाहीत. ही चाल त्यांच्या श्रमास चांगलें उत्पादकत्व येण्यास मोठी प्रतिबंधक आहे. ह्या वरील उदाहरणावरून शुद्ध श्रमसंयोगाची कल्पना वाचणारांस होईल हजारों कारखान्यांत असें आहे कीं, कांहीं मर्यादेपर्यंत श्रम करण्यास एकमेकांस उपयोगी पडणें हें जसजसें जास्त किंवा कमी तसतसें त्या श्रमाचें उत्पादकत्व जास्त किंवा कमी असतें. म्हणजे "एकमेकांस उपयोगी पडणें" याचें श्रमाचें उत्पादकत्व, याच्याशीं सरळ प्रमाण आहे. शुद्ध श्रमसंयोग ही सामाजिक सुधारणेची पहिली पायरी होय. दुसरी पायरी ही कीं, शुद्ध श्रमसंयोगाच्या योगानें उत्पन्न वाढतें म्हणून कांहीं लोक एकत्र होऊन शुद्ध श्रम संयोगाच्या योगानें धान्य उत्पन्न करूं लागले म्हणजे दुसरे कांहीं लोक एकत्र होऊन त्याच उपायानें आपणांस हवीं त्यापेक्षां अधिक वस्त्रें उत्पन्न करूं लागतात. आणि जास्ती झालेलीं वस्त्रें देऊन पहिल्या लोकांनीं जें अधिक धान्य उत्पन्न केलें असतें तें घेतात. आणि श्रमसंयोगाच्या योगानें दोघांपाशीं ही त्या प्रत्येकाच्या गरजेपेक्षां अधिक धान्य व वस्त्रें होतात. तेणेंकरून त्यांपाशीं भांडवल होऊन आपल्या कामांत मजूर ठेवण्याचें सामर्थ्य त्या दोन्ही समुदायांस येतें ह्या प्रमाणें शुद्ध श्रमसंयोगापासून पुढें मिश्र श्रमसंयोग होतो. असें वेकफिल्ड साहेबाचें मत आहे. आतां ह्या मिश्रश्रमसंयोगांत एक मुख्य कामाचीं अंगभूत जीं कामें तीं वांटून घेऊन व तीं करून मुख्य काम सिद्ध होण्यास श्रमकर्ते परस्परांस सहाय करितात. जसें सर्वांस धान्य व वस्त्रें पाहिजेत तर कोणी सर्वांस पुरेसें धान्यच करितात. व कोणी सर्वांस पुरेतशीं वस्त्रेंच करितात. आणि अशा रीतीनें एकमेकांच्या उपयोगी पडतात. ह्या दुसऱ्या प्रकारास बहुतेक अर्थशास्त्रकार श्रमविभाग म्हणतात.

श्रम संयोगाच्या वर सांगितलेल्या दोन प्रकारांमध्यें मोठा भेद आहे. तो हा कीं, शुद्ध श्रमसंयोग ज्याचा त्यास समजतो; व अशिक्षित मनुष्याच्या सुद्धां नजरेस दिसल्यामुळें सहज लक्षांत येतो. परंतु मिश्रश्रमसंयोग समजणारे थोडे. तो ज्यांच्या श्रमाचा संयोग असतो त्यांस सुद्धां बहुधा कळत नाहीं. ह्याचें कारण असें आहे कीं, अनेक मनुष्यें एकादें ओझें उचलूं लागलीं असतां आपण एकमेकांस सहाय्य करितों असें त्यांस समजतें. कारण ती गोष्ट डोळ्यांनीं दिसते. परंतु मिश्रश्रमसंयोगामध्यें निरनिराळीं मनुष्यें किंवा मनुष्यांचे समुदाय निरनिराळ्या जागीं निरनिराळ्या काळीं निरनिराळे उद्योग करितात. ह्याकरितां ते वास्तविकपणें एकमेकांस सहाय

करितात खरें; परंतु तें लक्षांत सहज येत नाहीं. तें लक्षांत येण्यास विचार लागतो.

एका शेतकऱ्याची साधी घोंगडी जरी घेतली तरी ती करण्याच्या श्रमाचा किती विभाग झाला आहे, म्हणजे ती घोंगडी तयार करण्याचें काम करण्यांत किती मनुष्यांच्या श्रमाचा संयोग झाला आहे हें आतां पाहूं. ती घोंगडी लोंकरीची असते ती लोंकर आम्हांस मेंढरांपासून मिळते. त्या मेंढरांस राखणारे धनगर व त्यांची लोंकर कापणारे लोक निराळे व ती सूत काढतां येण्याजोगी तयार करण्याचें काम करणारे निराळे. ह्या खेरीज लोंकरीच्या अवस्थेपासून शेवटपर्यंत त्या द्रव्याचें वेळो वेळीं स्थलांतर किती होतें, व तो पदार्थ तयार झाल्यावर गाडीतून अगर गलबतांतून इतर ठिकाणीं किती वेळ न्यावा लागतो; व किती उदम्याचे हातीं तें द्रव्य जातें. त्या गाड्या व माग वगैरे उत्पन्न करण्याच्या श्रमाचा विचार केला तर तो फार मोठा आहे; हें सर्व लोक शेवटीं उत्पन्न होणारी जी घोंगडी ती तयार होण्यास परस्परांस सहाय्य करितात. त्या सर्वांच्या श्रमानें तें फल उत्पन्न होतें. परंतु आपण परस्परांस सहाय्य करितों असें त्यांस वाटत नाहीं. व त्या कृत्यामध्यें त्यांचा पूर्व संकेत नसतो. संपत्ति उत्पन्न होण्यास श्रमविभाग किती उपयोगी आहे हें आतां वाचणाऱ्यांच्या ध्यानांत आलेंच असेल. जर श्रमविभाग अगदीं नसता तर हल्लीं जे पदार्थ उत्पन्न होतात, त्यांतून फारच थोडे पदार्थ उत्पन्न झाले असते. व बाकीचे मुळींच होतेना. असें कल्पाकीं, एका ओसाड व पिकाऊ जमिनीच्या बेटांत कांहीं मनुष्यें जाऊन वसाहत करून राहिलीं, तीं सर्व एकच धंदा करितात. प्रत्येक कुटुंबानें एक एक शेत घेऊन त्या शेतांत खपून त्या कुटुंबांतलीं मनुष्यें आपल्या निर्वाहापुरतें धान्य उत्पन्न करितात. आतां सर्वच धान्य उत्पन्न करणारे पडले, तेव्हां धान्य जास्त उत्पन्न करून तें विकत घेण्यास कोणी नाहीं; सबब प्रत्येक कुटुंबास धान्याखेरीज जे पदार्थ लागत असतील, ते कुटुंबांतल्या माणसांसच उत्पन्न करावे लागतात. अशा स्थितींत त्या बेटांतील जमीन जर बरीशी पिकाऊ असली, व त्या पिकाऊपणाच्याच मानानें त्या लोकांची संख्या असली, तर ते लोक धान्याखेरीज निर्वाहाचे दुसरे कांहीं पदार्थ उत्पन्न करतील. प्रत्येक कुटुंबांतील बायकांस कांहीं वेळ सांपडेल त्यांत त्या सूत काढून कुटुंबाच्या मनुष्यांस निर्वाहापुरतीं थोडीशीं मोटीं धोटीं वस्त्रें विणतील. तसेंच जेव्हां शेतांत निकडीचें काम नसेल तेव्हां कुटुंबांतील कांहीं माणसें खपून ओबड धोबड खोपटी बांधतील. किंवा तीं बांधलेली असल्यास तिची डागडुजी करतील. ह्या प्रमाणें धान्य (तेंही पाऊस जसा जास्त कमी पडेल त्या मानानें कधीं कधीं पुरतें मिळालें मिळालें, नाहीं नाहीं.) मोटें धोटें धडुत कांबरूण

सरासरी रवेंपटी त्यांच्या पलीकडे अधिक, कोणत्याही कुटुंबास प्रायः उत्पन्न करितां यावयाचें कठीण. हें इतकेंच उत्पन्न करावयास त्यांपैकीं बहुतेकांस पराकाष्ठेची मेहनत करावी लागेल. ते धान्य उत्पन्न करितील; तें कच्चा त्यांजवळचीं आउतें पराकाष्ठेचीं ओबड धोबड असल्यामुळें फारसें उत्पन्न व्हावयाचें नाहीं. खरवाचे व ऐष आरामीचे पदार्थ उत्पन्न करण्याची तर वार्ताच नको. कांकीं ते पदार्थ उत्पन्न करण्याचें ज्ञानच त्यांस नसतें. आणि कांहीं वस्तु त्यांस यदाकदाचित् करितां यावया जोग्या असल्या तरी त्यांस फावणार कोठून? व कांहीं जिन्नस करावयास त्यांस स्थलांतर करावयास पाहिजे, तेंही त्यांच्यानें करतां यावयाचें नाहीं. त्यास्तव असल्या लोकांत अनेक प्रकारचे धंदे असणार नाहींत. व जे थोडसे धान्यादि आवश्यक पदार्थ ते उत्पन्न करीत असतील त्यांतही फारसें उत्पन्न व्हावयाचें नाहीं. कांकीं त्यांचीं आउतें वाईट हें त्यांच्या श्रमाची उत्पादकता वाढण्यास मोठें प्रतिबंधन आहे, व तें असून दुसरें असें मोठें प्रतिबंधक कारण आहे कीं, कुटुंबाचे माणसांनीं आपल्या निर्वाहापुरतें धान्य स्वश्रमानें आपल्या जमिनींत उत्पन्न केलें म्हणजे त्यांची गुदरण होते. मग कुटुंबाचीं माणसें आहेत तितकीं आहेत तोंपर्यंत त्यांस आपल्या जमिनीचें उत्पन्न वाढण्यास किंवा विशेष श्रम करण्यास कांहीं हेतु नाहीं. हेतु असल्यावांचून उगीच मेहनत कोण करितो?

आतां असें कल्पा कीं, कांहीं लोक आपलीं हत्यारें घेऊन व एक वर्षाच्या बेगमीपुरतें धान्य बरोबर घेऊन त्या बेटांत येऊन राहिले. असें झाल्यास त्या शेतकरी लोकांच्या पूर्वीच्या स्थितींत मोठा विपर्यास पडेल. नवे आलेले कारागीर लोक त्या साध्या शेतकरी लोकांस आवडण्या जोगे शोभादायक पदार्थ अथवा उपयोगाचे पदार्थ करूं लागतील; आणि त्यांनीं बरोबर आणिलेलें धान्य संपण्यापूर्वी आणखी धान्य घेण्यास त्यांजपाशीं त्यांनीं नवा केलेला माल पुष्कळ होईल. असें झाल्यानें त्या पहिल्या शेतकऱ्यांस आपली संपत्ति वाढविण्याची विशेष उमेद येईल. त्यांस आतां खरवाचे व ऐष आरामीचे पदार्थ घेण्याची सोय झाली. जोंपर्यंत त्यांस कोणत्याही पदार्थाचें संपादन करण्यास स्वश्रमावांचून दुसरा मार्ग नव्हता तोंपर्यंत ते पदार्थ उत्पन्न होणेंच अशक्य होतें; मग ते त्यांस कोठून मिळावे. आतां त्यांनीं अधिक श्रम करून आपल्या जमिनींत धान्य वगैरे अधिक उत्पन्न केल्यास ते देऊन हे पदार्थ घेण्यास रस्ता खुला झाला; म्हणून शेतकऱ्यास आपलें उत्पन्न वाढविण्यास व विशेष श्रम करण्यास पूर्वी

हेतु नव्हता तो आतां हेतु झाला. आतां सोयीचे पदार्थ त्यांना जे मिळण्या जोगे झाले त्यांत त्यांस चांगली आउतें मिळतील, हें ही त्यांचा श्रम विशेष उत्पादक होण्यास मोठें साधन झालें. त्या अशा करण्यांनें बहुतेकांचें पहिल्यापेक्षां उत्पन्न वाढून त्यांस अधिक झालेलें धान्य कारागिरांस देऊन त्यांणीं स्वश्रमानें उत्पन्न केलेला माल विकत घेतां येईल. शेतकरी लोकांनीं धान्य जास्त उत्पन्न केल्यास त्यांला कोणी गिऱ्हाईक नव्हते तें हे कारागीर लोक त्यांसध्यें येऊन राहिल्यानें झालें व तेणेंकरून त्या बेटांतही संपत्ति वाढली; ती नवे आलेले लोक जो माल करूं लागले तेवढ्यानेंच वाढली असें नाहीं. तर ते आल्याच्या योगानें जें अधिक धान्यउत्पन्न होऊं लागलें तेणें करून ही वाढली.

अॅडॉमस्मिथ या नांवाचा एक शास्त्रवेत्ता होऊन गेला त्यानें श्रमविभागापासून तीन फायदे होतात; असें सांगितलें आहे. ते हे. (१) एकच धंदा केल्यानें कोणत्याही मनुष्यास त्या कामांत चांगलें चातुर्य उत्पन्न होतें. (२) तो त्या धंद्यांत चांगला प्रवीण झाला म्हणजे त्यास काळ कमी लागतो; नाहीं तर आज हा एक धंदा उद्यां एक निराळाच अशानें कोणताही धंदा पूर्ण न होतां वेळमात्र पुष्कळ जातो. (३) तोच धंदा चालविल्यापासून तिसरा फायदा हा आहे कीं, त्या कामांत नवी कल्पना निघून नवीन यंत्रें निघतात. तेणेंकरून पुष्कळ मनुष्यांचें काम थोड्यांकडून होऊं लागतें.

आतां पहिल्या गोष्टी विषयीं विचार करूं— कोणताही धंदा तोच तो करूं लागल्यापासून तें काम दिवसें दिवस चांगलें होत जातें. पहा, एखादा लोहाराचा मुलगा आहे व त्यास कामाचा अनुभव नाहीं, त्यास जर कांहीं मोळे करण्यास लाविलें तर त्याचे हातून २००।३०० हून अधीक मोळे तयार होणार नाहींत. असें करितां करितां करितां कांहीं दिवसांनीं तितक्याच वेळांत तो ८०० करील. आतां मोळे करण्याचाच धंदा ज्या मुलास आहे तो तितक्याच वेळांत २३०० करील. सारांश श्रम आणि काल ज्यांणीं ज्या धंद्यांत पुष्कळ घातला आहे त्याचें काम त्या धंद्यांत चांगलें होईल.

दुसऱ्या गोष्टीवर विचार— त्यांत कालाची हानि फार होते हें कांहीं बरोबर नाहीं. काल-हानि ही एक धंदा सोडून दुसरा धंदा करूं लागल्यानें होते. कोणती ही वस्तु करण्यापूर्वीं तिचीं साधनें मिळविलीं पाहिजेत उदाहरण- पेटी करण्यास लांकूड हें द्रव्य व हत्यारें हीं साधनें मिळविलीं पाहिजेत. ही एक पेटी झाल्यावर दु-

सरी लौकरच चांगली होईल. या प्रमाणें पुढें चालविल्यास त्या धंद्यांत कोणीही निपुण होत जाईल परंतु त्यानें पेटी केल्यावर जर त्यास जोडा करावयास सांगितला किंवा कागद लिहावयास सांगितला तर त्यास तें काम साधणार नाहीं. असें निरनिराळे धंदे करूं लागल्यानें त्यास कोणताही धंदा चांगला करितां येणार नाहीं.

श्रमविभागापासून होणारा तिसरा लाभ कांहीं अंशीं मात्र खरा आहे, मनुष्याचें लक्ष एकाद्या कामाकडे जसजसें अधिक लागेल व जसजसा त्या कामाविषयीं तो अधिक विचार करील, तशी तशी तें काम थोड्या श्रमानें करण्याची विशेष कल्पना त्यास सुचेल. व त्या मनुष्यास उपयुक्त कल्पना सुचण्याचा जसा संभव आहे तसा ज्याचें लक्ष अनेक कामांकडे असतें त्याला सुचण्याचा संभव नाहीं. हें स्पष्ट आहे. परंतु कौशल्य आलें तथापि कल्पना सुचणें ही गोष्ट मुख्यत्वें करून कारागिराच्या बुद्धीवर व कल्पकतेवर जितकी आहे तितकी एकच काम करण्यावर नाहीं. व मनुष्य एकाच कामाकडे सर्व लक्ष्य देऊन इतर कामाकडे अगदीं दुर्लक्ष करूं लागला तर त्याच्या हातून सुधारणुकीची कांहीं एक कल्पना न निघतां तो जें काम करितो तें सुद्धां व्हावें तसें होण्याचा विशेष संभव नाहीं. आणखि एक गोष्ट अशी आहे कीं, यंत्रादिकांच्या कल्पना निघण्यास कारण कांहीं असो, कल्पना एकदां निघाल्या नंतर पुढें जें श्रमाचें उत्पादकत्व वाढतें त्यास कारण म्हटलें म्हणजे त्याच कल्पना होत. श्रमविभाग नव्हे कांकीं यंत्राची योजना कामांत झाल्यावर श्रमविभाग नसला तरी श्रमाचें उत्पन्न वाढलेंच.

**सेवा किंवा उपयोग याची वृद्धि**— एक मनुष्य एक लखोटा घेऊन पोष्टाकडे जात आहे तर तो त्या वेळीं हजारसुद्धां लखोटे नेऊं शकेल. सबब अशा कामाला जास्त मनुष्यें ठेवण्याचें कारण नाहीं. म्हणून पोस्टांतून ½ पेनीला १००० कोस सुद्धां पत्रें जाऊं शकतात.

**प्रतीची वृद्धि**— एका मनुष्यास एक पुस्तक छापावयाचें आहे, तर एकवार त्याचे टाईप जुळले म्हणजे त्यावरून हजारों प्रती निघतात. हा केवढा फायदा आहे. ही कला निघण्याचे पूर्वी यूरोपांत शेक्सपीयरच्या ग्रंथास २११ पौंड पडत आणि आता त्यांस दोन शिलिंग पडतात. यावरून किती नफा आहे हें दिसून येईल.

**मनुष्याची योग्यता**— ह्या प्रमाणें अनेक धंदे सुरू असले म्हणजे य-

नुष्य पाहिजे त्यांत शिरू शकेल. उदाहरण- सशक्त मनुष्य लोहाराचा धंदा करील, कल्पक घड्याळें करील. अडाणी दगड उचलूं शकेल व असें नसेल तर घड्याळें करणाऱ्याचे हातून घड्याळें करण्याचें काम सोडून लोहाराचें काम होईल काय? होणार नाहीं इतकेंच नव्हे तर त्याच्या आंगीं असलेलें चातुर्यही व्यर्थ जाणार सबब श्रमविभागापासून अनेक धंदे निघतात. व प्रत्येक मनुष्यास आपल्या योग्यते प्रमाणें कोणत्याही धंद्यांत शिरतां येतें.

**स्थलयोग्यता-** मागें सांगितलेंच आहे कीं, ज्याज्या ठिकाणीं जेंजें चांगलें होत असेल. त्या त्या ठिकाणीं तेंतें उत्पन्न करावें परंतु हें श्रमविभाग नसेल तर होणार नाहीं. जसें फ्रान्सची दारू, अमेरिकेचा कापूस, हिंदुस्थानची अफू इत्यादि. या प्रमाणें स्थलयोग्यता वाढते व श्रमविभाग राष्ट्राराष्ट्रांत सुरू होतो. आणि अप्रतिबंध व्यापार चालतो.

---

# भाग ५ वा.

## भांडवल.

**भांडवलाची व्याख्या-** धनाच्या उत्पादनास तिसरी अवश्य गोष्ट म्हटली म्हणजे 'भांडवल' ही होय. असें पूर्वींच सांगितलें आहे. आतां त्या भांडवलाची वाचकांस समजूत होण्यासारखी व्याख्या करितों. "धनोत्पत्तीस मदत व्हावी या हेतूनें पूर्वीं संचित करून ठेविलेली जी द्रव्यादि सामग्री तीस अर्थशास्त्रकार **भांडवल** असें म्हणतात, अथवा ज्याच्या योगें धनोत्पत्ति जास्त होते त्यास **भांडवल** असें म्हणतात." सर्व भांडवल हें संपत्ति आहे असें म्हणणें रास्त आहे. परंतु सर्व संपत्ति हें भांडवल आहे असें मात्र म्हणतां येत नाहीं. जर एका मनुष्याजवळ पुष्कळ धान्याचा संग्रह आहे. किंवा पुष्कळ पैसा आहे आणि तो जर त्याचा व्यय श्रमाकडे न लावितां बसून खाईल, तर त्याच्या धनसंग्रहास भांडवल म्हणतां येणार नाहीं. परंतु जर त्याचा व्यय करीत असतां एखादें घर बांधील अथवा विहीर खणील तर मात्र त्याच्या धनसंचयास भांडवल म्हणणें योग्य आहे. कारण अशा उत्पन्न केलेल्या वस्तूंपासून कांहीं श्रम वांचतील व उपयोगही होईल.

**भांडवलाविषयीं गैरसमजूत-** ज्या लोकांस अर्थशास्त्राची कल्पनाही ना-

हीं, असे पुरुष 'भांडवल म्हणजे नाणीं' असें समजतात. परंतु केवळ नाणें हेंच संपत्ति नव्हे, या विषयीं पूर्वीच प्रतिपादन केलें आहे, त्या वरून भांडवल व नाणीं हीं एकच अशी समजूत बाळगणें भ्रांतिमूलक आहे, असें स्पष्ट होतें. पहा भांडवलापासून संपत्युत्पत्ति जशी सुलभरीतीनें होते तशी ती नाण्यापासून साक्षात् होत नाहीं; तर मग नाण्यासच भांडवल कसें म्हणतां येईल. ज्याच्या पाशीं नाणीं आहेत, त्यास संपत्युत्पत्ति करणें झाल्यास आपल्या जवळचीं नाणीं देऊन संपत्युत्पत्तीस अवश्य जीं द्रव्यें (हत्यारें) किंवा दुसरी सामग्री, ती घ्यावी लागते. यावरून संपत्युत्पत्तीचें वास्तविक साधन म्हटलें तर नाणें नव्हे. वास्तविकपणें पहातां द्रव्ये, संरक्षण साधनें, आणि मजूरांकरितां अन्नवस्त्र इत्यादि साधनास भांडवल हें नांव देणें शोभेल. भांडवलाचें स्वरूप व्यक्त होण्यासाठीं आपण एक दाखला घेऊन पाहूं. साळी लोकांच्या भांडवलाचा कांहीं भाग त्याच्या मागांत असतो. कांहीं हत्यारांत असतो, कांहीं सुताराकडे असून कांहीं कामास लागलेल्या मनुष्यांच्या अन्नवस्त्राकडे असतो. आतां उघडपणें पाहिलें असतां साळी किंवा तांबट वगैरे भांडवलवाले हे मजुरांस अन्न व वस्त्र प्रत्यक्ष रीतीनें देत नाहींत, पैसा देतात. परंतु सूक्ष्म विचारानें पाहिलें असतां तो पैसा दाणेवाल्यांवर आणि दुकानदारांवर दिलेल्या चिठ्यांसारखाच आहे. या करितां त्या मजूरांस वरील प्रकारचे भांडवलवालेच अन्न देतात, असें म्हटलें असतां चिंता नाहीं;

## भांडवलाच्या व्ययाविषयींचे सिद्धांत—

(१) जर एकादा मनुष्य चैनीच्या पदार्थांमध्येंच आपला पैसा खर्च करील तर भांडवलाचा व्यय केवळ त्याच्या सुखाकरितांच झाला असें होतें.

(२) अनुत्पादक श्रमामध्यें जर एकादा मनुष्य आपल्या द्रव्याचा व्यय करील तर त्या भांडवलाचा व्यय केवळ मजुरांस अन्न देण्याकरितां झाला असें होतें.

(३) आणि जर एखादा मनुष्य उत्पादक श्रमामध्यें आपल्या द्रव्याचा व्यय करील तर त्या भांडवलापासून नफा होतो इतकेंच नव्हे, तर दुसरे कलमांत सांगितलेप्रमाणें मजुरांस निर्वाहाचें साधन दिलें असें होतें.

वरील तीनही नियमावर कांहीं उदाहरणें आहेत तीं खालीं लिहिल्या प्रमाणें—

पहिल्या नियमाचें उदाहरण— अशी कल्पना करूं कीं, 'क्ष' नें 'ज्ञ' पासून १००० रुपये कर्जाऊ काढिले व ते त्याणें मेजवान्यांत व ख्याली खुशालींत ख-

र्च केले तर अर्थात या उदाहरणांत त्या हजार रुपयांपासून कांहीं नवी संपत्ति उत्पन्न न होतां त्यांचा नाश झाला.

आतां 'क्ष' पूर्वी जितका मातबर होता तितकाच हल्लीं आहे. त्याचा कांहीं तोटा झाला नाहीं, कांकीं, त्याच्या जवळचे १००० रुपये जरी प्रत्यक्ष गेले तरी ते दस्तरूपानें त्याच्या जवळ आहेतच. व त्यास पाहिजे तेव्हां त्या खताचें बेचन करून रुपये घेतां येतील. परंतु 'ज्ञ' मात्र हजार रुपये जाऊन पहिलेपक्षां भिकारी झाला. श्रीमंत कोणीच झाला नाहीं. यावर कोणी असें म्हणतील कीं, 'ज्ञ' हा मातबर झाला नाहीं म्हणून कोणीच मातबर झाला नाहीं, असें कसें म्हणतां येईल? कारण 'ज्ञ' चे रुपये ज्या उदम्यांच्या हातीं गेले. ते तर पहिल्यापेक्षां मातबर झाले नाहींत काय? तर या शंकेचें निवारण असें दिसतें कीं, 'ज्ञ' पासून उदम्यांनीं जर रुपये ठकवून घेतले असते तर ते त्यांस मिळाले असें म्हणणा पाहिजे तर, परंतु तशी गोष्ट झाली नाहीं. बरोबर १००० रुपयांचा जिन्नस 'ज्ञ' नें उदम्यापासून घेऊन त्या जिनसांचा अनुत्पादकत्वें करून उपभोग केला किंवा त्यानें इष्टमित्रांकडून तो करविला तेव्हां पहिल्यापेक्षां मातबर उदमी झाले असें कसें म्हणावें. तथापि त्यांचा माल विकून जर त्यास नफा जाहला असेल तर ती शंका खोटी आहे. कारण 'ज्ञ' नें ते रुपये उत्पादकत्वें करून जर खर्चिले असते तरी हे जिन्नस विकण्यांत उदम्यास नफा होऊन आणखी 'ज्ञ' ला मजुरांनीं उत्पन्न केलेले निदान हजार रुपयांची तरी संपत्ति नवीन जाहली असती. तेव्हां 'ज्ञ' च्या अनुत्पादकव्ययानें उदमी संपत्तिमान् झाले असें म्हणतां येत नाहीं. 'ज्ञ' च्या उधळेपणानें १००० रुपयांचा माल अगदीं नाश झाला व त्या नाशापासून नवीन संपत्ति अगदीं उत्पन्न झाली नाहीं. परंतु या बाबतींत 'क्ष' चा नाश कांहीं झाला नाहीं. त्याला त्याच्या रुपयांचें व्याज मिळतच आहे. परंतु तें व्याज त्याला हजार रुपयांपासून मिळत नाहीं. तर 'ज्ञ' च्या मिळकतींतून मिळतें. ती मिळकत 'ज्ञ' ला दुसऱ्या भांडवलापासून झाली आहे. या उदाहरणावरून ते १००० रुपये 'क्ष' चें भांडवल असतांही देशाचें भांडवल नव्हे, आणि तें खर्चिल्यानें पहिल्यापेक्षां देश तेवढ्यानें संपत्तिहीन झाल्यामुळें भिकारी झाला. तो तोटा त्यांतले केवळ हजार रुपये गेले इतकाच नाहीं तर ते रुपये उत्पादकत्वें करून खर्चिल्यानें होणारा नफाही बुडाला. मात्र खर्च करणाऱ्या मनुष्यास चैनीचें क्षणिक सुख जाहलें. हें पहिल्या नियमाचें उदाहरण आहे तें सरकारासही

लायक आहे. पहा, त्यांनीं घेतलेलें द्रव्य जर रस्ते, नळीं वगैरे बांधण्याकडे खर्च झालें तर त्यास भांडवल म्हणावें. व बंदूक, दारू, अतसबाजी, लढाई इत्यादिकांकडे तें खर्च झालें तर त्यास भांडवल म्हणूनये.

दुसरा नियम— सरकारांनीं एके ठिकाणीं रेल्वे करण्याचा विचार केला व तें काम पुष्कळ पैसा खर्च करून निम्मे शिम्में केलें, व पुढें कांहीं अडचण आल्यानें तें त्यांस अजीबात सोडून देणें भाग पडलें, तर त्यांत जो पैसा खर्च झाला तो केवळ अनुत्पादक झाला असें म्हणणें भाग आहे. अशीं पुष्कळ उदाहरणें देतां येतील.

तिसरा नियम— एका मनुष्यानें एका सावकाराजवळून १००० रुपये कर्ज काढून त्यानें एक शेत घेतलें व त्यांत विहीर काढून त्याच्या योगानें शेत उत्तम लागवडीस आणिलें, तर त्यांत त्यास नफा झाल्याशिवाय रहावयाचा नाहीं. म्हणजे हें धन उत्पादक झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. वरील उदाहरणावरून आणखीही या नियमावर उदाहरणें देतां येतील.

**भांडवलाचे प्रकार—** एक विनाशी[+] भांडवल व दुसरें अविनाशी भांडवल असे यांत दोन प्रकार आहेत. त्याचीं लक्षणें स्पष्ट होण्यासाठीं प्रत्येकाचीं कांहीं विशेष कार्यें सांगतों.

(१) विनाशी भांडवल— कोणताही पदार्थ घेतला तरी त्यास उत्पन्न व्हावयास जें भांडवल लागतें त्यापैकीं कांहीं भांडवल असें असतें कीं, त्याची योजना ती जिन्नस उत्पन्न करण्याकडे एकवेळ झाली म्हणजे त्या भांडवलाचा भांडवलपणा जातो. तें पुनः तो जिन्नस उत्पन्न करण्याच्या उपयोगीं पडत नाहीं. निदान नवा झालेला जिन्नस आहे तोंपर्यंत तरी दुसरा पदार्थ त्यानें उत्पन्न होत नाहीं. कोणताही पदार्थ उत्पन्न करण्यास कांहीं द्रव्यें लागतात. जसें तेल्याच्या व्यापारांत तीळ, हलवायाच्या व्यापारांत दूध, साखर, मसाला हीं द्रव्यें. घर बांधण्याच्या कामांत दगड, विटा, कौलें वगैरे द्रव्यें लागतात. पहिल्या उदाहरणांत तिळांचें एकवेळ तेल निघालें म्हणजे तिळांचे रूपानें त्याचा नाश होतो. ते तीळ तेलाच्या रूपानें दुसरा जिन्नस उत्पन्न करण्यास कारण होवोत. परंतु तेल उत्पन्न करण्यांत ते एकवेळच उपयोगी पडतात. दुसऱ्यानें उपयोगी पडत नाहींत. त्याप्रमाणें दूध वगैरे हलवायाच्या दुकानांत लागणारे जिन्नस तिस-

---

+ यासच कांहीं ग्रंथकार फिरतें भांडवल व स्थिर भांडवल असें म्हणतात.

ज्या उदाहरणांत घरास लागणारें सामान विटावगैरे नवीन घर बांधण्यास उपयोगीं पडतात. परंतु पूर्वीचें घर पाडिल्याशिवाय उपयोगीं पडत नाहींत.

२ अविनाशी भांडवल–कांहीं भांडवल असें आहे कीं; त्यानें एकदा संपत्ति उत्पन्न झाली असतां त्याचा नाश होत नाहीं. त्या भांडवलानें उत्पन्न झालेला जिन्नस विद्यमान असून तें आणखी जिन्नस उत्पन्न करण्यास उपयोगीं पडतें. जसें विणखे यंत्रें वगैरे हत्यारें, तसेंच माल ठेवण्याकरितां व विकण्याकरितां बांधिलेल्या वखारी, लोखंडी सडका, कालवे, गाड्या, गलबतें. इत्यादि याच प्रकाराखालीं येतात. तसेंच जमिनीचें पीक वाढण्याकरितां बांधिलेल्या विहिरी, आउतें, माल नेण्या आणण्याकरितां बैल, बंदरें इत्यादि यांत मोडतात व एकदा उपयोगीं पडून त्यांचा नाश होत नाहीं. सबब त्याचा पुष्कळ उपयोग होतो व त्यापासून आणखी जास्त भांडवल वाढतें म्हणून यांस अविनाशी भांडवल म्हटलें पाहिजे.

---

# भाग ६ वा.

# संपत्त्युत्पादक कारणाचे ठायीं कमजास्ती उत्पादकत्व आणणाऱ्या गोष्टींविषयीं.

संपत्ति उत्पन्न होण्यास श्रम, जमीन, आणि भांडवल हीं जीं तीन कारणें आहेत त्यां पैकीं श्रम व जमीन हींच कारणें मुख्य होत. कारण भांडवल हें स्वतःच्या श्रमाचें फल होय म्हणून त्यास जें कारणत्व आहे तें वास्तविक पाहतां परंपरेनें श्रमासच आहे असें जरी आहे तथापि भांडवलाविषयीं निराळें सांगण्याची गरज कमी होत नाहीं. कोणताही पदार्थ उत्पन्न करण्यास साक्षात् लागू होणारा श्रम जसा आवश्यक आहे, तसा त्या पदार्थाच्या भांडवलाच्या उत्पत्तीस लागणारा श्रमही आवश्यक आहे. आतां भांडवलाचा मोठा भाग ज्यांच्या श्रमानें संपत्ति उत्पन्न होते असे जे मजूर त्यांच्या पोषणाकडे जातो व बाकीचा अंश साक्षात उपयोगीं पडणारीं जीं हत्यारें व द्रव्यें त्यांकडे जातो.

आतां अर्थशास्त्रांतील दुसऱ्या विषयाचें म्हणजे संपत्त्युत्पादक जीं तीन

कारणें आहेत त्यांच्या ठायीं कमजास्तीपणा ज्या कारणांनीं येतो त्या कारणांचें विवेचन करूं. हा कमजास्तीपणा भिन्नकाळीं भिन्नदेशीं भिन्नभिन्न असतो हें स्पष्ट आहे. लोकसंख्या व देशविस्तार हीं सारखीं असतांहीं कांहीं देशांत कांहीं काळीं इतर काळांतल्यापेक्षां उत्पन्न जास्त असतें. जसें इंग्लंदाच्या विस्ताराएवढा हिंदुस्थानांतील एकादा प्रांत घेतला, तर इंग्लंदचें उत्पन्न त्या प्रांतांतील उत्पन्नापेक्षां मनस्वी अधिक आहे. असें दिसून येईल. तसेंच इंग्लंदांतील लोकांइतके हिंदुस्थानांतील लोक घेतले तर त्या दोघांचीं उत्पन्नें सारखीं आढळत नाहींत. त्याप्रमाणेंच चारशें वर्षांपूर्वीचें इंग्लंदचें उत्पन्न तेथल्या हल्लींच्या उत्पन्नापेक्षां फारच कमी होतें तसेंच मिसरदेश, सिसली बेट, व हिंदुस्थान या देशांतल्या पूर्वीच्या उत्पन्नापेक्षां हल्लींचीं उत्पन्नें अतिशयच कमी आहेत. आतां उत्पादक शक्तींत असा कमजास्तीपणा होण्याचीं कांहीं कारणें स्पष्ट आहेत व कांहीं तादृश स्पष्ट नाहींत. ह्यास्तव कांहीं कारणा पैकीं कित्येक कारणांचें वर्णन करूं.

पहिलें कारण— देशाच्या अंगच्या संपत्ति उत्पन्न करण्याच्या सोयी हें होय. ह्या सोयी अनेक प्रकारच्या आहेत; त्यांत मुख्य-पहिली सोय- जमिनीचा पिकाऊपणा ही आहे. गंगावगैरे नद्यांच्या थड्या फारच पिकाऊ आहेत व मारवाड आफ्रिकेचा मध्यभाग या देशांतील मैदानांत पीक मुळींच होत नाहीं;-दुसरी सोय उत्तम प्रकारची हवा- ही होय. ही पहिल्या सोयीपेक्षां विशेष उपयोगीं आहे. पृथ्वीवरील कांहीं देशांत पीक होण्याजोगी जमीन असून ही तेथें थंडीच्या कडाक्यामुळें लागवड होत नाहीं. उत्तरध्रुवांतल्या व त्याच्या जवळच्या देशांतील लोक माशांवर व तेथील विद्याचार संपन्न लोक रेंडीर नामक जनावरें बाळगून त्यांच्या मांसावर निर्वाह करितात.- कांहीं ठिकाणीं हवा चांगली नसल्यामुळें नागली, वऱ्या वगैरे भिकार धान्यें मात्र उत्पन्न होतात. ज्या देशांत चांगली हवा आहे असें जें हिंदुस्थान, मसाल्याचीं बेटें, इटाली, स्पेन इत्यादि देश आहेत त्यांत गहूं, हरभरा, द्राक्षे, अंजीर, ऊंस, जायपत्री, वेलदोडे, लवंगा इत्यादि जिन्नस उत्पन्न होतात. चांगल्या हवेपासून जमिनींत तीनतीन वेळांही पीक येतें. तसेंच इमारतीस टिकाऊपणा येतो. लुकजार व कर्नाक येथील देवळें मोडकीं गेलीं. परंतु त्या देवळाच्या दगडावर कोरलेले लेख हजार वर्षांचे जुनें असतांही इंग्लंदांतील पन्नास वर्षांच्या लेखांपेक्षां चांगले दिसतात तसेंच सेंतपित-

र्सबर्ग जवळ चांगल्या कणरवर काळ्या दगडाच्या इमारती बांधल्या आहेत. त्यांस बांधून चाळीस वर्षें झालीं नाहींत तों पुन्हा बांधण्यासारख्या झाल्या आहेत या- चें कारण हवा होय. तसेंच इताली वगैरे देशांतील तयार झालेल्या सणगांचे रंग इंग्लंदांतील रंगापेक्षां विशेष लखलखीत व भडक दिसतात. याचें कारण तेथील चांगली हवा हें होय. या हवेच्या योगानें जें काम होतें त्याची बरोबरी अर्वाचीन रसायन शास्त्राच्या ज्ञानाच्या व रंगविण्याच्या कलेच्या बळानें ज्या देशांतील ह- वा चांगली नाहीं, त्या देशांतील झालेल्या कामास येत नाहीं. देशाची हवा चां- गली असल्यापासून दुसरा असा फायदा आहे कीं, संपत्ति उत्पन्न करणारे मजूर व कारागीर यांचा निर्वाह थोड्या खर्चानें होतो. उष्णदेशांत मनुष्याचें थंडीवाऱ्या पासून चांगलें रक्षण होण्यास थंड देशांतल्यासारखीं भक्कम घरें व पुष्कळ चिरगुटें लागत नाहींत. थंड देशांतील मनुष्यास साधारण सुख होण्यास किं- बहुना जीवन धारण होण्यास आवश्यक जें जळण त्याची उष्णदेशांतील राह- णारांस मुळींच गरज पडत नाहीं. तें फक्त सैंपाक करण्यास व लोहार घिसाडी वगैरेच्या कारखान्यांत मात्र लागतें. तसेंच थंड देशांत मेहनत करणाऱ्याच्या अं- गीं हुशारी राखण्याकरितां कांहीं पदार्थ खावे लागतात ते खाण्याची गरज उ- ष्णदेशां मुळींच पडत नाहीं. तेथें केवळ हवेच्या स्वाभाविक उष्णतेनें त्याचें तें काम होतें ह्यावरील गोष्टीवरून इतर देशांत केवळ जीवनोपयोगी पदार्थ संपाद- न करण्याकरितां जे श्रम करावे लागतात. ते श्रम उष्णदेशांत लोक जर विचारी व दूरदृष्टी असतील तर त्यांस सुखोप भोगाचे पदार्थ करण्याकडे किंवा ज्ञान सं- पादण्याकडे लावावयास सांपडतील.

तिसरी सोय— देशांत उपयुक्त पदार्थांच्या व थोड्या खर्चांत चालणाऱ्या चांगल्या खाणी असणें ही होय. इंग्लंद देशाची हवा व जमीन चांगली ना- हीं, असें असून, त्या देशास विशेष संपत्युत्पादकत्व असण्याचें एक मोठें का- रण, तेथें उत्तम व उथळ अशा खाणी आहेत. तसेंच त्या देशांत ज्या लोखंडा- च्या खाणी आहेत, त्यांतील मातींतून थोड्याश्रमानें शुद्ध धातु काढितां येते, व या लोखंडाच्या खाणी कोळशाच्या खाणीजवळ आहेत, ही मोठी सोय आ- हे.

चौथी सोय— समुद्र जवळ असणें, ही होय व त्यांत स्वाभाविक चां- गलीं बंदरें असतील तर फारच उत्तम. त्याच्या खालोखाल महत्वाची सोय ना-

वा चालावया जोग्या मोठ्या नद्या असणें ही होय. ह्या सोयीपासून नवी संपत्ति साक्षात् उत्पन्न होत नाहीं. तर माल एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं लौकर व थोड्या श्रमानें नेतां येतो; येणेंकरून क्रयविक्रय लौकर व सलभरीतीनें होतो, यामुळें उत्पन्न वाढतें. समुद्र जवळ असणें वगैरे सोयीपासून जो फायदा होतो, तो हा कीं, जमीन किंवा हवा हीं चांगलीं नसल्यामुळें व खाणी वगैरे नसल्यामुळें संपत्तीची जी न्यूनता येते, ती नाहींशी होऊन तो देश ज्यास चांगली जमीन वगैरे सोयी असतात, त्यापेक्षां फार संपन्न असतो, असें पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतें.

आंगच्या सोयी असल्या म्हणजे उत्पादकत्व वाढतें म्हणून सांगितलें; व धनोत्पत्तीस आणखी कांहीं कारणें आहेत, तीं असून ह्या सोयी असल्यास देश धनाढ्य झालाच पाहिजे. परंतु आजपर्यंतच्या घडलेल्या स्थितीवरून असें स्पष्ट दिसतें कीं, ह्या सोयींनीं देशास जितकी संपत्ति यावी असें वाटतें तितकी येत नाहीं. प्राचीनकाळीं किंवा अर्वाचीन काळीं पाहिलें तरी असें दिसेल कीं, ज्या देशांत उत्तम जमीन व उत्तम हवा हीं होतीं, किंवा आहेत, ते देश अत्यंत सधन किंवा पराक्रमी होते, किंवा आहेत असें नाहीं. तर ते देश बहुतकरून अत्यंत गरीब व दुर्बल अशा देशांत मोडत आले आहेत. (त्यास युनायस्टेट्स सारखे अपवाद क्वचित् असतील.)

अशा देशांतील मनुष्यानें थोडा श्रम केला असतां त्याचा निर्वाह सहज होतो. अशा देशांतले लोक आवेश असल्यास तो आहे तों पर्यंत मेहनत करण्यास अगदीं कसर करीत नाहींत. परंतु त्यांच्यानें झटून श्रम करवत नाहीं. ते लवकर कंटाळतात; त्यांस विशेष काळजी वहावी लागत नाहीं, अतएव ते अदूरदर्शी असतात. त्यामुळें कालांतरीं जे लाभदायक व्हावयाचे असे जे उत्तम प्रकारचे राज्यनियम ते स्थापण्याविषयीं ते लोक बहुतकरून फारसें लक्ष देत नाहींत. म्हणून त्यांच्यामध्यें मालमत्तेचें रक्षण होत नाहीं; आणि तेणेंकरून श्रम करण्याविषयीं त्यांची प्रवृत्ति कमी पडते; व श्रमावांचून संपत्ति उत्पन्न होत नाहीं; यावरून देशास विशेष संपत्त्युत्पादकत्व येण्यास जें दुसरें कारण आहे त्याचें विवेचन करितो.

**दुसरें कारण-** दृढ श्रम, म्हणजे नियमानें व सदोदीत सारखा श्रम करण्याची संवय हें होय. अत्यंत आळशी व गमणारा असा जरी मनु-

ष्य असला, तरी प्रसंगवशात् एखादा लवकर होणारा लाभ नजरेपुढें असतां त्या-
च्या प्राप्तीकरितां मरेमरे तों श्रम करितो. व कष्ट सोशितो. यावरून मनुष्यांमनुष्यां-
मध्यें किंवा जाती जातींमध्यें जो भेद दिसतो, तो फलसन्निधि असतां त्याच्या प्राप्ती-
करितां झटून काम करण्यांत तादृश नाहीं; तर दूरच्या फलाकरितां प्रकृत काळीं
मेहनत करण्यांत व काम साधारण असो किंवा कसेंही असो, तें करण्याकडे पू-
र्ण अवधान लावण्यांत आहे. कोणतेंही काम असलें तरी तें मन लावून करण्याचा
स्वभाव इंग्रज लोकांच्या आंगीं फार विलक्षण आहे. व तीच ती गोष्ट करण्यास ते
कधीं कंटाळत नाहीत. उगीच गप्पा मारीत बसणें, किंवा ख्याली खुशालींत वे-
ळ घालविणें, येणेंकरून त्यांस सुखच होत नाहीं. तेथील प्रत्येक मनुष्य आ-
पआपल्या कामांत निमग्न असतो. तेणेंकरून इंग्लंदांतील कारखान्यांत माल
फार उत्पन्न होतो. तेथील लोक इतर ठिकाणीं गेले असतां, त्यांच्या हातून इं-
ग्लंदांतल्यासारखें काम तेथें होत नाहीं; कारण त्यांच्या हाताखालचे लोक बे-
तानें व मन लावून काम करीत नाहींत; व त्यांच्या गमण्याच्या संवयीनें त्या का-
रागिरांच्या वेळेची खोटी होते. कांहीं देशांतील लोक बुद्धीनें व कौशल्यानें इं-
ग्लंदांतील काम करणाऱ्या लोकांपेक्षां वरचढ आहेत; परंतु श्रमकरितांना इंग्लंद-
च्या कारागिरांचें लक्ष जसें सर्वकाळ हातीं घेतलेल्या कामाकडे असतें, तसें इतर
कोणत्याही लोकांचें लागलेलें असत नाहीं; हें इंग्लंदच्या लोकांच्या सामान्य स्व-
रूपाचें वर्णन केलें. त्यास उभयप्रकारेंही अपवाद पुष्कळ आहेत. म्हणजे इंग्लं-
दांत गमणारे लोक पुष्कळ आहेत; व इतर देशांत नियमानें व सतत श्रम करणा-
रेही पुष्कळ आहेत.

तिसरें कारण— देशांत विशेष संपत्ति उत्पन्न होण्याचें तिसरें कारण 'तेथी-
ल लोकांचें ज्ञान व कलाकौशल्य' हीं होत. लोकांस जसें थोडें बहुत कलांचें ज्ञान
असतें, त्यामानानें त्यांच्या श्रमास थोडी किंवा बहुत उत्पादकता असते, व त्या क-
लांची विशेष वृद्धि झाली, आणि स्वतःसिद्ध पदार्थांची व त्यांच्या शक्तींची पूर्वींपे-
क्षां उत्तम योजना संपत्ति उत्पन्न करण्याकडे होऊं लागली; म्हणजे पूर्वींच्या इतक्या श्र-
मानें पूर्वींपेक्षां अधिक संपत्ति उत्पन्न होते. ही गोष्ट सहज लक्षांत येणारी आहे.

येथें ज्ञान म्हणजे सृष्टपदार्थांच्या धर्माचें ज्ञान घ्यावयाचें. हें ज्ञान प-
दार्थविज्ञान, यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र इत्यादिकांच्या अभ्या-
सानें होतें. हें ज्ञान संपत्ति उत्पन्न होण्यास कसें लागू पडतें, असा विचार

ल्यावर आपणांस असें दिसून येईल कीं, हें ज्ञान साक्षात् श्रम करणाऱ्यांसच असलें पाहिजे असें नाहीं. तर त्यांचे हातून काम करून घेणारे जे त्यांचे धनी त्यांचे ठिकाणीं असलें तरी चालेल. ज्ञानानें मुख्य उपयोग हा होतो कीं, तेणेंकरून नवीन यंत्रें व हत्यारें करण्याच्या कल्पना निघतात; व त्या यंत्रांचीं व हत्यारांची योजना कशी करावी, हें समजतें. आतां यंत्रादिकांपासून फायदा कसा होतो हें थोडें सांगतों.

संपत्ति उत्पन्न होण्याचे कामांत कांहीं कामें अशीं अचाट आहेत कीं, तीं केवळ मनुष्याच्या शक्तिनें कधींही होणार नाहींत. व कांहीं इतकीं सूक्ष्म व नाजूक आहेत कीं, तीं त्यांस कधींही व्हावयाचीं नाहींत. व मनुष्याचा हात लागण्याबरोबर नासून जातील, तर असलीं कामें यंत्रें आहेत म्हणून होतात. यंत्रापासून खरेखर जलद आणि थोड्या श्रमानें पुष्कळ काम होतें, आणि वांचलेला श्रम आणि वेळ दुसऱ्या कामाकडे लावितां येतो.

संपत्ति उत्पन्न करण्यांत ज्ञान उपयोगीं पडतें, तें हत्यारें व यंत्रें ह्यांच्या द्वारेंच पडतें असें नाहीं; तें उपयोगीं पडण्याचे मार्ग अनेक आहेत. शेतकीच्या कामांत ज्ञानापासून हे पुढील लाभ होतात. जमिनीचे गुण व तींत होणाऱ्या वनस्पतीचे गुण वाढवावयाच्या कृति समजूं लागतात. लागवडीनें पिकाऊपणा जातो. तो आणण्यास नींत चांगलीं व थोड्या खर्चीत होणारीं खतें घालणें, चांगल्या रीतीनें झाडांची खच्ची करणें, इत्यादि अनेक प्रकारच्या कृति ज्ञानानें प्राप्त झाल्या आहेत. तसेंच रंगाच्या कारखान्यांत थोड्या खर्चीत कपडे स्वच्छ करण्याची; त्यांवर चांगले रंग उठविण्याची; व तो रंग तकतकीत होण्याची, व तो पाहिजे असल्यास, पक्का होण्याच्या वगैरे कृति ज्ञानापासूनच प्राप्त होतात. कांहीं कृतीपासून पदार्थांचा गुण सुधरत नाहीं पण काम थोड्या काळांत होतें. कांहीं कृतीच्या योगानें अनुपयोगी पदार्थ उपयोगास लागतात; कांहीं कृतीच्या योगानें पूर्वी फार द्रव्य लागत असतें, तें थोडें लागूं लागतें.

चौथें कारण— देशांतल्या साधारण लोकांत चाणाक्षपणा, व विचार करण्याची साधारण शक्ति, आणि बहुश्रुतता, हीं वाढलीं असतां तेथील संपत्ति वाढते. ही गोष्ट समजणें विशेष कठीण आहे; व ती कितीएकांस मुळींच खरी वाटत नाहीं. संपत्ति उत्पन्न करण्याच्या कारखान्यांत कितीएक कामें अशीं आहेत, कीं तीं केवळ सरावानें चांगलीं करितां येत नाहींत. तीं चांगलीं होण्यास करणाऱ्याच्या आंगीं कल्पना व विचारशक्ति हीं असावीं लागतात. ह्यास्तव वर सांगितलेल्या गु-

णांची मनुष्यें पुष्कळ झाली असतां, हल्लीं बहुतेक कारखान्यांत देखरेख करणाऱ्यांस जे एवढे मोठे पगार द्यावे लागतात, ते द्यावे लागणार नाहींत. व सर्वच मनुष्यांस कोणत्या रीतीनें काम केलें असतां चांगलें होईल, हें सांगणारे मिळत नाहींत, व ते मिळाले, तरी सर्वकाळ त्यांच्या जवळ बसून अमुक अमुक असें करावें, असें त्यांस सांगणें दुसऱ्याच्या हातून संभवत नाहीं; ह्यास्तव त्यांच्या बुद्धीप्रमाणें त्यांस आपलें काम करावें लागतें; तर त्या सर्वांस आपापल्या कामास जितकें ज्ञान पाहिजे असतें तितकें असल्यास त्यांच्या श्रमाचें उत्पादकत्व किती वाढेल बरें? पहा, शेतकरी, माळी, रंगारी, चांभार, लोहार, सोनार ह्यांस वनस्पतिशास्त्र व रसायनशास्त्र ह्यांतील व्यापक व उपयुक्त नियमांची चांगली माहिती झाल्यास, त्यांस केवढा उपयोग होईल? मनुष्याची साधारण विचारशक्ति वाढलेली असली म्हणजे त्यास कोणी कांहीं बऱ्याची गोष्ट सांगितली असतां, ती समजते; व त्यास आपलें हित कशांत व अहित कशांत आहे हें समजूं लागतें. तो आपल्या कामांत अव्यवस्थितपणें रहात नाहीं; त्यास विचाराच्या योगानें दूरचे अनर्थ दिसूं लागतात. व असें झालें म्हणजे तेणेंकरून संपत्ति उत्पन्न करण्याचे कामांत मोठा फायदा होतो. चोहोंकडे शाळा घालून वगैरे साधारण लोकांत उपयुक्त विद्येचा प्रसार केल्यापासून जे कांहीं इतर लाभ होतात, ते संपत्ति उत्पन्न करण्यांत होणारे जे लाभ वर सांगितले, त्यांपेक्षां फार मोठे आहेत; तथापि हे वरचे लाभ क्षुल्लक आहेत असें समजूं नये.

पांचवें कारण— देशांतील साधारण लोकांचें आचरण चांगलें झाल्यानें संपत्ति वाढते. मजूर, कारागीर वगैरे कैफी असल्याने त्यांची बुद्धि, शरीरें हीं खराब होतात. व त्यांचें मन चंचल होऊन त्यांच्या हातून एकसारखा दृढ श्रम होत नाहीं. व तेणेंकरून संपत्ति उत्पन्न व्हावी तशी होत नाहीं. ह्या खेरीज मनुष्याचे आचरणांत एक मोठा दोष असतो, तो तर संपत्तीच्या उत्पत्तीस फारच बाधक आहे. तो अप्रामाणीकपणा हा होय. श्रम करणारांचें व कारागिरांचें उत्पादकत्व पुष्कळ अंशीं त्यांच्या प्रामाणीकपणावर आहे. जो गडी आपल्या घरी सकाळपासून दोन महर पर्यंत दोन तीनशें पेंढ्या बांधितो त्यासच दुसऱ्यानें मजुरी देऊन त्याच कामास लाविलें असतां तो शंभर पेंढ्या देखील बांधीत नाहीं. तसेंच सुतार, गवंडी, सोनार, गवळी इत्यादि लोक अप्रामाणिकपणा करून कसे ठकवितात. हें पुष्कळांस माहीत आहेच. कामास लाविलेले मजूर व कारागीर हे अप्रामाणिकपणा क-

रून रोज फुकट खातात. म्हणून धन्यास डोळ्यांत तेल घालून त्याजवर दे-खरेख ठेवावी लागते, व ह्या विषयीं जितका श्रम करावा लागतो तितका सर्व उ-त्पादक श्रमांतून कमी करून मनुष्यांच्या अप्रामाणिकपणामुळें देखरेखीकडे लावणें भाग पडतें; व खरोखर ह्या श्रम संपत्युत्पत्तीस आवश्यक नाहीं; व मजुरांनीं व कारागिरांनीं कामांत कुचराई करूंनये म्हणून कितीही उपाय केले तरी त्या बाहेरील उपायांनीं करविलेल्या कामास त्यांनीं आपल्या इमानानें केलेल्या कामाची कदापि सर येणार नाहीं. अप्रामाणिकपणानें देशाच्या संपत्तीचा कितीनाश होतो तो पहा. शेंकडो लोक दुसऱ्यांस लुटून व ठकवून उपजीवन करितात. ह्या लोकांच्या उपजीवनाचा देशावर मोठा भार आहे. तसेंच अशा दुष्टलोकांवर रखवाली करण्याकरितां, व बंदोबस्ताकरितां, पोलीस ठेवावे लागतात. व दुष्ट लोक निवडून काढून त्यांस शिक्षा देण्याकरितां माजिस्ट्रेट कोर्टें ठेवावीं लागतात. तीं व दिवाणी कोर्टें, कांहीं अंशीं मनुष्याचे दुष्ट आचरणामुळेंच झालीं आहेत. मनुष्याचें आचरण चांगलें असतें, तर हे कारखाने बाळगण्याचें ओझें देशावर कशास पडतें? अप्रामाणिकपणा कमी झाल्यानें ह्या नाशाच बंद होईल. असें नाहीं तर नवी संपत्ति पुष्कळ होईल. मोठालीं कामें म्हटलीं म्हणजे तीं एकट्याचे श्रमानें, बुद्धीनें किंवा भांडवलानें होण्याजोगीं नसतात. तीं होण्यास अनेक लोकांची जूट व्हावी लागते. तर लोकांचा एकमेकांवर विश्वास वाढला असतां व आपण दुसऱ्यास भागीदार केलें असतां, तो आपलें काम विश्वासानें करील, असें मनुष्यास वाटूं लागलें असतां पाहिजे तितक्या जुटी होतील; व व्यापार मोठा होऊन त्यामुळें संपत्ति वाढेल. ह्या प्रमाणें संपत्ति उत्पन्न होण्यास अप्रामाणीकपणापासून अनेक विघ्नें येतात, व तिचा नाश होतो. म्हणून प्रामाणीकपणाचें आचरण असणें हें देशास उत्पादकत्व विशेष येण्यास एक कारण आहे. असें सिद्ध होतें.

सहावें कारण— देशास विशेष संपत्युत्पादकत्व आणणारीं जीं वर कारणें सांगितलीं त्या सर्वांपेक्षां हें मुख्य होय. मनुष्य संपत्ति उत्पन्न करण्यासाठीं श्रम करितो, व अनेक प्रकारचीं दुःखें सोशितो; तो संपत्तीचा आपणास उपभोग घेतां येईल म्हणून करितो, व सोशितो. परंतु पुष्कळ श्रम करून व अडचणी सोसून जर अखेरीस त्याच्या मेहनतीचें व बुद्धीचें फळ दुसरा बळकावितो, तर तो मनुष्य ज्यांपासून पोट चालत नाहीं, तेवढें मात्र उत्पन्न करील; त्यापेक्षां अधिक उत्पन्न करण्याविषयीं

षयीं त्याची प्रवृत्ति कधींही होणार नाहीं. ह्यास्तव देशांत उत्तम प्रकारें संपत्ति उत्पन्न होण्यास मालमत्तेचें चांगलें संरक्षण असलें पाहिजे. मालमत्तेचें पूर्ण संरक्षण म्हटलें म्हणजे, ज्याची मालमत्ता असेल, त्याच्या मर्जीवांचून त्यापासून ती दुसऱ्यास घेतां येऊंनये. मालकाच्या खुशी वांचून मालमत्तेचें हरण दोन प्रकारांनीं होतें; व तिचें संरक्षणही दोन प्रकारांनीं होतें. चोर, ठक, परचक्र ह्यापासून देशांतील मालमत्तेस अपाय होतो; व त्याचें निवारण सरकाराकडून होतें तसेंच सरकार व त्याचे कामगार ह्यापासून मालमत्तेस अपाय होतो; व त्याचें निवारण उत्तमप्रकारची राज्यव्यवस्था व उत्तम प्रकारचे कायदे ह्यांच्या योगानें होतें मालमत्तेच्या संरक्षणाचे हे दोन ही प्रकार फार आवश्यक आहेत; व त्यांत ही दुसरा प्रकार विशेष आवश्यक आहे. आशिया खंडांतील अनेक देश सरकाराच्या अपहारामुळेंच दरिद्रावस्थेंत आहेत, व इंग्लंद वगैरे यूरोपांतील देश, ज्यांत लोक हुषार व विद्वान आहेत, त्या देशांतील लोकांनीं उत्तमप्रकारच्या राज्यव्यवस्था व कायदे आपल्या देशांत करून घेतले आहेत; त्यामुळें त्या देशांतील सरकारास प्रजेच्या मालमत्तेचें हरण करितां येत नाहीं.

कधीं कधीं राजाचे कामगार राजाच्या जातीचे, व प्रजा निराळ्या जातीची असल्यामुळें राजाकडून आपल्या जातीविषयीं पक्षपात होऊन, त्यापासून प्रजेस झालेल्या उपद्रवाची दाद लागत नाहीं. ह्या देशांत मागें मुसलमानी राज्य होतें त्यावेळीं मुसलमान अम्मलदार हिंदूस हवे तसे लुटीत तेव्हां हिंदूची दाद कोठें लागे? हल्लींच्या राज्यांत प्रजेस उपद्रव होण्याचें वरसांगितलेलें कारण आहे, परंतु कांहीं अंशीं सरकारच्या चांगल्या कायद्यांनीं व दुसऱ्या अनेक कारणांनीं, त्या जातीचा उपद्रव प्रजेस फारसा होतो असें म्हणतां येत नाहीं.

मालमत्तेचें संरक्षण होण्यास जसें राजभय कारण आहे, तसें किंबहुना त्यापेक्षां मोठे लोक भय हें कारण आहे. मोठमोठ्या सावकारांचा व्यापार खतापत्राशिवाय होतो, तरी बहुतकरून एकमेकांस ठकवीत नाहींत. यावरून त्या लोकांस प्रामाणिक म्हणतां येत नाहीं; कारण प्रसंगवशात ते इतर लोकांस ठकवितात. मनुष्य ज्या लोकांत राहतो, त्याचें भय राजापेक्षांही अधिक असतें. वाणी, शिंपी, सोनार इत्यादि लोक गिऱ्हाइकांस ठकवितात, पण ते एकमेकांस ठकवीत नाहींत. मिल्ल वगैरे ग्रंथकाराचें असें मत आहे कीं, इग्लंदांत मालमत्तेचें जें संरक्षण होतें ते लोक भयानें जितकें होतें तितकें तेथील उत्तम राज्यव्यवस्थेनें, व उत्तम काय-

यांनीं देखील होत नाहीं.

देशास विशेष उत्पादकत्व येण्याचीं मुख्य मुख्य कारणें सांगितलीं; ह्या खेरीज निरनिराळे कायदे, लोकांच्या रीतिभाति, धर्म इत्यादि अनेक गोष्टी देशाचें उत्पादकत्व वाढविण्यास, किंवा कमी करण्यास कारण आहेत. परंतु ह्या लहानशा ग्रंथांत त्यांचें निरूपण करितां येणार नाहीं. तथापि ह्या स्थळीं सामान्यरूपानें इतकें सांगतों कीं; ज्याज्या कायद्यांच्या व रीतिभातींच्या योगानें मनुष्याचें ज्ञान वाढतें; व त्यास त्याच्या भांडवलाचा, वेळेचा, व ज्ञानाचा अत्यंत योग्य कामांत विनियोग करितां येतो; व ज्यांच्या योगानें त्याच्या श्रमाचें सर्वफल त्याच्या स्वाधीन राहतें; दुसऱ्यास तें बुचाडतां येत नाहीं; आणि ज्यांच्या योगानें एकाच्या हिताकरितां दुसऱ्याचा नाश होत नाहीं; अशा प्रकारचे कायदे, रीतिभाति देशास सधन करितात, व ज्यांनीं विपरीत कार्यें होतात, त्यांनीं देश दरिद्री होतो.

---

# प्रकरण २

## भाग १ ला.

## संपत्तीच्या वांटणीविष- यीं विषयारंभक सूचना.

जमीन, श्रम व भांडवल हीं संपत्युत्पादनाचीं तीन मुख्य तत्वें आहेत. असें मागील प्रकरणीं सांगितलें आहे ज्या अर्थी या तीन तत्वांवांचून संपत्युत्पादन होणें शक्य नाहीं त्या अर्थी ज्यांची या तीन तत्वांवर मालकी असेल, त्यांमध्यें उत्पन्न झालेल्या संपत्तीची वांटणी होणें हें स्वाभाविक आहे. जमिनीच्या मालकांस जो संपत्तीचा हिस्सा मिळतो, त्यास सारा म्हणतात; मजूरदार लोकांस जो हिस्सा मिळतो त्यास रोजमुरा म्हणतात, व भांडवलवाल्यास जो मिळतो त्यास नफा म्हणतात. एकंदरीत सारा, रोजमुरा व नफा अशा तीन रूपांनीं संपत्तीची वांटणी होण्यास व्यक्तिमात्रांचा हक्क आहे.

सारा किंवा भाडें, रोजमुरा व नफा या शब्दांचा प्रचारांत जो अर्थ असतो त्याहून जास्त व्यापकत्वानें त्यांचा अर्थ या शास्त्रांत समजावा लागतो. हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. साऱ्यामध्यें अंशतः व्याजाचा समावेश होतो. रोजमुऱ्यांतही अंशतः व्याज येतें व नफ्यामध्यें रोजमुऱ्याचा समावेश होतो. हें खालील प्रतिपादनावरून सहज कळेल.

**जमीनदारांचा हिस्सा– सारा–** घराच्या मालकास घराबद्दल जें मिळतें त्यास भाडें किंवा सारा म्हणतात. परंतु तें सर्व भाडें नव्हे, कारण घर तयार करण्यासाठीं त्या मालकानें भांडवल घातलेलें असतें त्याचें व्याज त्यास मिळणें योग्य आहे. यास्तव मिळणाऱ्या भाड्यांतून व्याज वजा करून जें राहतें त्यास मात्र घराचें खरें भाडें म्हणावें. व हें त्यास ज्या जमिनीवर घर बांधिलेलें असतें त्याकरितां मिळतें. तसेंच शेतामध्यें, कुंपण, गोठा, पाट, वगैरे सोयी करण्याचे कामीं जमीनदारांनीं भांडवल घातलेलें असतें, त्याचें व्याज त्यास मिळणाऱ्या साऱ्याच्या रकमेंतून वजा करून जें राहील त्यास जमिनीचा खरा सारा म्हणतात. यावरून साऱ्यामध्यें व्याजाचा समावेश होतो असें जें वर सांगितलें

आहे तें योग्य आहे असें सहज वाचकांच्या ध्यानांत येईल.

**मजुरांचा हिस्सा- रोजमुरे-** मजुरास त्याच्या श्रमासाठीं जें मिळतें त्यास रोजमुरा म्हणतात. परंतु काम करणाऱ्या मजुरांचीं जीं हत्यारें असतात तीं तयार करण्यामध्यें त्यांनीं आपलें भांडवल घातलेलें असतें; त्या भांडवलाचें व्याज मजुरांस मिळणाऱ्या रोजमुऱ्यांतून वजा करून जी बाकी रहाते तीस खरा रोजमुरा म्हणतात. यावरून रोजमुऱ्यामध्यें अंशतः व्याजाचा समावेश होतो, असें वाचकांच्या ध्यानांत येईल.

**भांडवलवाल्यांचा हिस्सा- नफा-** एकाद्या भांडवलवाल्यानें आपलें भांडवल पेढीवाल्याकडे व्याजानें लाविल्यास, त्यास व्याज मिळतें; परंतु असें न करितां, त्याणें आपलें भांडवल एकाद्या कारखान्यांत घातलें, तर त्यास स्वतः मजुरांवर जी देखरेख करावी लागते, व कामाची व्यवस्था ठेवावी लागते, त्या श्रमाचें वेतन त्यास मिळणें योग्य आहे. तसेंच कारखान्यामध्यें अनेक प्रकारचे धोके येऊन ते बंद पडतात; तेणें करून त्याचें मोठें नुकसान होण्याचा संभव असतो. ह्यावरून भांडवलवाल्याच्या नफ्यामध्यें खालील तीन तत्वांचा समावेश होतो.

१ धन संचयासाठीं जे त्यानें आयास भोगिले असतात, त्यांचें बक्षीस.

२ व्यापारांत जो धोका येतो, व तेणेंकरून जें नुकसान होतें, त्याची भरपाई.

३ कामावर देखरेख करण्याकरितां लागणाऱ्या श्रमाचा रोजमुरा.

या सर्व उपपादनावरून संपत्तीची वांटणी सारा, रोजमुरा, व नफा अशा तीन प्रकारांनीं होत असते. व या शब्दांचा अर्थ प्रचारांतील अर्थाहून जास्त व्यापक असतो, हें वाचकांस सहज समजेल. आतां या तीन प्रकारांचें अनुक्रमें विवरण या प्रकरणांतील पुढील भागांत केलें आहे.

---

## भाग २
## सारा.



जमिनीच्या मालकास जो संपत्तीचा अंश मिळतो त्यास सारा असें

म्हणतात. कांहीं देशांत पुरातन काळापासून पडलेल्या चालीवरून सारा मिळत असतो. इंग्लंदवगैरे देशांत जो शेतकरी चढाओढीनें जास्त सारा देईल, त्यास जमीन देण्याची वहिवाट आहे. जमीन ही परिमित आहे; व ती मिळावी अशी सर्वांस इच्छा असते. त्यामुळें जमिनीच्या मालकास सारा मिळतो. लागवडीस योग्य अशा जमिनीस सारा कां मिळतो त्याचीं कारणें दोन आहेत. एक जमिनीचा सुपीकपणा व दुसरें तिची योग्य संस्थिति. त्या दोन सोयींचा ज्या जमिनीमध्यें अभाव असेल तीस कोणी सारा देणार नाहीं. पहा, एखाद्या माळजमिनींत लागवड केली, व तींत भांडवल घातलें; परंतु त्या जमिनीपासून लागवड करण्यास लागलेल्या श्रमाचें वेतन व भांडवलाचा नफा हीं जर निघणार नाहींत; तर अशी जमीन वहिवाटीस आणण्याची कोण उमेद करील. सारांश अशा जमिनींची लागवड होणार नाहीं. तसेंच जमीन अत्यंत सुपीक आहे परंतु तींत उत्पन्न होणारा माल खपण्याजोगी जर तिची संस्थिति नसेल, म्हणजे तींतील माल खपण्यास जर शहर नजीक नसेल तर त्या जमिनीस सारा मिळणार नाहीं.

सर्व देशांतील जमिनी कमजास्त सुपीक असतात. ज्या देशांत सारा चढाओढीनें मिळण्याचा परिपाठ असतो, त्या देशांत जमिनीचा सुपीकपणा जसा असेल, व जशी तिची मोठ्या शहराजवळ संस्थिति असेल, त्यामानानें साऱ्याचें मान कमजास्त असतें. आतां कोणत्याही जमिनीचा सारा कशावरून ठरवितां येतो, या प्रश्नाचा उलगडा होण्यासाठीं रिकार्डो साहेबाच्या साऱ्याविषयीं तत्वाची माहिती येथें देतों.

**रिकार्डोचें साऱ्यासंबंधीं तत्व-** सुपीकपणावरून कोणत्याही देशांतील जमिनीचे अनेक प्रकार असतात; परंतु या प्रकारांस कांहीं मर्यादा असते म्हणजे जी जमीन अगदीं निरस असते किंवा जिची संस्थिति शहराजवळ नसते, यामुळें जींत उत्पन्न झालेला माल खपण्याचें साधन नसतें, अशी जमीनही लागवडीची मर्यादा होय. कारण या जमिनींत कष्टमशागत केल्यास घातलेलें भांडवल व श्रम हीं भागण्यापुरताच माल यांतून उत्पन्न होतो. या जमिनीस सारा नांवचा मात्र असतो. अशा जमिनीपेक्षां ज्या इतर अधिक सुपीक जमिनी असतात; त्यांस सारा येतो. या साऱ्यावरून ही अगदीं निकृष्ट जमीन व ह्या इतर चांगल्या जमिनी यांचे मोलाचें अंतर समजतें. परंतु अशा उभयविध जमिनीमधील निवळ उत्पन्नाच्या अंतरावरून मोल समजतें यावरून कोणत्याही एकाद्या विशेष जमिनींत होणारें उ-

त्पन्न, व अगदीं निकृष्ट जमिनींत होणारें उत्पन्न, यामध्यें जें अंतर असतें या उ त्पन्नाचे अंतरावरून त्या विशेष जमिनीच्या साऱ्याचा अंदाज करितां येतो. हें उदाहरणानें दाखवितों. अ आणि ब असे दोन शेतकरी आहेत. अ ची जमीन सुपीक आहे, व ब ची नापीक आहे. त्या दोनही शेतांच्या मळण्या झाल्या. त्यांत ब पेक्षां अस १००० रुपये जास्त नफा झाला. यावरून ब पेक्षां अ हा १००० रुपये जास्त सारा देण्यास समर्थ होईल हें उघड आहे. परंतु, जर घातलेलें भांडवल व श्रम याबद्दल कांहीं फायदा होत नाहीं असें ब स दिसून येईल तर तो त्या शेताची लागवड करणार नाहीं. कदाचित् सारा माफ केल्यास मात्र तो त्याची लागवड करील. यावरून कोणत्याही जमिनीचा सारा म्हणजे अगदीं कनिष्ठ जमीन व चांगली जमीन यांचे मधील निवळ उत्पन्नाचें जें अंतर त्यास सारा म्हणतात. आतां जर अ च्या मालकानें १५०० शें रुपये जास्त सारा मागितला तर त्यास या व्यापारांत कांहीं नफा होणार नाहीं. सबब तो ती जमीन सोडावयास कबूल होईल; म्हणून मालकास याहून जास्त सारा मिळणार नाहीं. आतां सारा कमी कां होणार नाहीं याचा विचार करूं. इतर शेतकरी हे शेत चांगलें आहे, असें कळतांच अ जर ७०० रुपयांस करण्यास कबूल असला तर चढाओढीनें ते तीनशें रुपये जास्त देण्यास कबूल होतील. सबब सारा कमी होणें चढाओढीमुळें शक्य नाहीं.

**जमीन लागवडीची मर्यादा**— ज्या जमिनीस सारा अगदीं पडत नाहीं, अशा लागवड केलेल्या निकृष्ट जमिनीपेक्षां व एकाद्या विशेष जमिनीमध्यें जें जास्त उत्पन्न होतें, त्यावरूनच त्या विशेष जमिनीचा सारा ठरवितां येतो. व हीच अगदीं निकृष्टजमीनलागवडीची मर्यादा ठरते. त्यापेक्षां ती मर्यादा कांहीं कारणावांचून खालीं उतरत नाहीं. अशा कारणप्रसंगीं मात्र होत असलेल्या कमी फायद्यावर संतुष्ट रहावें, किंवा तसें नसल्यास जमिनीचा सुपीकपणा जेणेंकरून वाढेल अशा तजविजी कराव्या, असें शेतकऱ्यांस वाटतें. ही गोष्ट होण्यास दोन कारणें आहेत तीं—

१ धान्यादिकांचा खप जास्त होण्याचा संभव असल्यास त्या जमिनीचें मोल वाढेल.

२ शेतकीची सुधारणा जेणेंकरून होईल अशी तजवीज केल्यानें शेतकीचें उत्पन्न जास्त होईल. वरील उदाहरणामध्यें ( ब ) कडे असलेल्या

शेतानें लागवडीची मर्यादा दाखविली जाते; कारण (ब) ला त्या जमिनींत घातलेलें भांडवल व त्याचें स्वतांचें परिश्रम सफळ होण्यापुरतें मात्र उत्पन्न होतें. यास्तव अशा जमिनीस सारा कोणी देणार नाहींत. तथापि प्रसंगविशेषीं या जमिनीवर सारा येऊं लागतो. म्हणजे लागवडीची मर्यादा अधिकाधिक उतरत जाते.

**लागवडीमध्यें सुधारणा झाल्यानें साऱ्यामध्यें फरक पडतो**- जमिनीचा सुपीकपणा हा पूर्वीपासून वाढत आला आहे. तसेंच लागवडीस लागणाऱ्या हत्यारांमध्यें सुधारणा जास्त झाल्यानें तिचा सुपीकपणा उत्तरोत्तर आणखी वाढत आहे. यामुळें प्रत्येक शेताचा निवळ फायदा जास्त वाढण्याचा संभव आहे; तर अशा प्रसंगीं जमिनीचे सारे वाढणें हें साहजिक आहे. परंतु सारे चढतांच लागवडीची मर्यादा उतरते. कारण वाफेच्या यंत्रादिकांच्या सहाय्यानें लागवडीचा खर्च कमी होतो; यामुळें फायदा जास्त होतो. म्हणून शेतकऱ्यांना शेवटीं अशा सुधारणेच्या पद्धतीनें लागवड झाल्यामुळें विशेष फायदा होत नाहीं. कांहीं काळपर्यंत मात्र फायदा होतो. कारण आरंभींच वाफेच्या यंत्रादिकांचा उपयोग जे करूं लागतात; त्यांचा बराच काळपर्यंत नफा होतो. परंतु या प्रमाणें सर्वच लोक यंत्रांचा उपयोग करूं लागण्यापूर्वी जमिनीचे सारे वाढत नाहींत. शेवटीं सर्व नफा जमिनीच्या मालकाचाच होतो. कारण लागवडीचा खर्च जर कमी झाला, तर शेतकऱ्यांस सारा जास्त देण्याचें सामर्थ्य येतें. व भांडवलाच्या चढाओढीनें साऱ्याच्या चढतीस प्रतिबंध होत नाहीं. लागवडीस खर्च कमी लागेल, तर जमिनीच्या उत्पन्नास लागणारा खर्च कमी होतो; यामुळें धान्य सवंग होतें; यास्तव सर्वांबरोबर शेतकऱ्यांचाही फायदा होतो.

**सारा चढण्या उतरण्याचीं कारणें**- ज्या कारणानें लागवडीचा खर्च कमी होतो, त्याच कारणानें सारे चढतात. आणि याच्या उलट लागवडीचा खर्च जास्त झाल्यास, सारे उतरतात. मजुरांचे रोजमुरे वाढल्यास लागवडीचा खर्च वाढतो. विद्यावृद्धि झाल्यानें शेतकींत काम करणाऱ्या लोकांना आपल्या श्रमापासून फायदा कसा करून घ्यावा हें समजूं लागलें आहे. व आगगाड्या वगैरे साधनें झाल्यानें, मजुरांस एका देशाहून दुसऱ्या देशास सहज जातां येतें; यामुळें स्वदेशांत योग्य रोजमुरे न मिळाल्यास ते परदेशांत जातात. मजूर लोक परदेशांत जाऊं लागल्यानें पूर्वींचे रोजमुरे वाढलेले आहेत ते वरील कार-

णानें जर असेच वाढत जातील, तर सारा व भांडवल यांचा नफा कमी होत जाईल. मजुरांचे रोजमुरे वाढतांना, भांडवलाचा नफा जर कमी न होईल, तर साऱ्यामध्यें कमतरता येईलच.

रिकार्डो साहेबाच्या साऱ्यासंबंधीं उपपत्तीवरून पाहतां लागवडीची मर्यादा उतरत उतरत आली किंवा नाहीं हें पाहणें महत्वाचें आहे. असें धान्याचे दर कायम असतां, व लागवडींत कांहीं सुधारणा न होतां जर शेतकाम करणाऱ्या मजुरांचे रोजमुरे चढतील, तर ज्या जमिनीची लागवड जाहली आहे, त्यांपैकीं बऱ्याच जमिनीपासून फायदा होणार नाहीं. यास्तव लागवडीची मर्यादाही चढेल, आणि साऱ्याचे दर उतरतील.

**लोकसंख्येच्या वृद्धीनें साऱ्यामध्यें फेरफार कसे होतात-** लोकसंख्या वाढल्यानें किंवा कमी झाल्यानें जसा साऱ्यामध्यें फेरफार होतो, तसा कशानेंही होत नाहीं. थोड्याच काळामध्यें इंग्लंडची लोकसंख्या शेंकडा २५ प्रमाणें वाढली आहे. व या वाढलेल्या मनुष्यास जास्त लागणारें धान्य इंग्लंडच्या जमिनीपासून उत्पन्न करावयाचें आहे, असें घेऊन चालूं. पूर्वीपेक्षां जास्त धान्य मिळविण्यासाठीं जास्त जमिनीची लागवड केली पाहिजे. याकरितां शेतकऱ्यांस वाईट जमीन लागवडींत आणण्यांत येणारा खर्च धान्याच्या वाढलेल्या किंमतींतून भागेल. या प्रमाणें जमिनीच्या लागवडीची मर्यादा उतरत चालली यामुळें सर्व जमिनीचा सारा जास्त चढेल. तो सारा शेतकरी लोक धान्याची जी जास्त किंमत येते, तींतून भागविण्यास समर्थ असतात. यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, लोकसंख्या वाढल्यामुळें जमिनीचा सारा व धान्याची किंमत हीं वाढतात, व असें होणें वाजवी आहे.

**सारा हें कार्य होय, कारण नव्हे-** आतां आपण असें समजूं कीं, सरकारानें जमिनीवरील सारा अगदीं सोडिला, तरी जमिनींत लागवडी करण्यांत कांहीं फेरफार होणार नाहींत. कारण पूर्वी त्या भागांतील लोकांस जितकें धान्य लागत असे, तितकें आतांही लागणार. यामुळें अर्थात पूर्वी जितकी लागवड करावी लागे, तितकीच आतांही केली पाहिजे, हें उघड आहे. आतां सरकारी सारा अजी कमी झाल्यानें धारण सवंग होईल. यामुळें निकस जमिनीची लागवड करण्यापासून फायदा नसल्यानें त्यांची लागवड होणार नाहीं; परंतु असें होऊं शकणार नाहीं. कारण धान्याचा जो खप होणार त्यांत कांहीं फेरफार न झाल्यानें अशा जमिनीची

लागवड करावी लागणारच, असें वरतीं सांगितलें आहे. यावरून हें सिद्ध हो-तें कीं, जमिनीचा सारा अजी कमी केल्यानें धान्याचे दर सवंग होणार नाहींत;म्ह-णजे धान्यादिकांची किंमत चढणें याचें सारा हें कार्य होय, कारण नव्हे. म्ह-णजे जरी सारा मोलाचा अंगभूत अंश आहे, तथापि यामुळेंच उत्पन्न झा-लेल्या जिनसाची किंमत वाढत नाहीं हें सिद्ध आहे.

---

## भाग ३
## हिंदुस्थानांतील जमिनीविषयीं.

मागील भागांत सारा, साऱ्याबद्दल रिकार्डोसाहेबाचें तत्व व त्यामध्यें फेरफार कां होतात, याचीं कारणें सांगितलीं आहेत. आतां या भागांत हिं-दुस्थानांतील जमिनीविषयींची माहिती देतों. कारण या देशांतील दोन तृतीयांशापेक्षां जास्त लोक शेतकीवर निर्वाह करणारे आहेत. यामुळें हा सर्व देश शेतकीचाच आहे, असें म्हटलें असतां चालेल. तेव्हां यांतील जमिनीची मालकी कोणाची व तिचे उपभोग कसे होतात, व त्यांत फरक काय याची माहिती येथें देणें योग्य समजून दिली आहे. या देशांतील जमीन बहुतकरून सरकारी आहे; व सरकार हें तिचें मुख्य मालक आहे. शेतकरी लोक ज्या जमिनी वापरतात, त्यांजबद्दल त्यांस सरकारास सारा द्यावा लागतो. शेताचा उपभोग करूं देण्याकरितां सरकार शेतकऱ्यांकडून जो कर घेतें, त्यास सारा असें म्हणतात. कांहीं ग्रंथकार सारा ह्या शब्दाची व्याख्या करितात ती अशी ' जमिनीचे जे स्वाभाविक व अंतस्थ गुण असतील त्या गुणांचा उपयोग करूं देण्याकरितां, शेतकरी शेताच्या उत्पन्नापैकीं जो अमुक भाग सरकारास देतो, त्यास सारा असें म्हणतात.' साऱ्याचें हें दुसरें लक्षण जास्त महत्वाचें आहे. कारण जमिनींत पीक जास्त चांगलें यावें, एतदर्थ आपण पैसा खर्चून, ज्या ज्या सुधारणा करितों, जसें विहीर खोदणें, तलाव बांधणें, पाण्याचा पाट आणणें वगैरे. त्या सुधारणा दुसऱ्या सदराखालीं घातल्या पाहिजेत; म्हणजे त्यांचा जमाखर्च भांडवलखा-

8704

त्याकडे केला पाहिजे. जमिनीचा सारा कमजास्त होणें हें पुढील गोष्टींवर अवलंबून असतें. जमीन जशी सुपीक अथवा निकस व रुक्ष असेल व ती एखाद्या मोठ्या बाजारापासून जशी दूर अथवा नजीक असेल, त्या मानानें तिच्यांत पिकणाऱ्या जिनसा जशा कमजास्त भावानें बाजारांत विकल्या जात असतील त्या भावाच्या मानानें जमीन कसण्यास जो खर्च लागत असेल, त्या खर्चाच्या मानानें इत्यादि सर्व गोष्टींनीं जमिनीचा सारा कमी किंवा जास्त होतो. हिंदुस्थानांत जमिनी साऱ्यानें दिल्या जातात, त्यांच्या पद्धति दोन आहेत. एक **रयतवारी** व दुसरी **जमीनदारी**.

**रयतवारी पद्धत**- जमिनीचे लहान लहान भाग करून ते भाग रयतेस अमुक वर्षें पावेतों अमुक दरानें सरकाराकडून दिले जातात. या रयतेचें नांव, गांव सरकारच्या नोंदवहींत लिहिलें जाऊन त्या रयतेचें पूर्णस्वामित्व त्या भागावर असतें व जो सारा त्याच्या भागावर ठरला असेल तो त्यास प्रत्यक्ष सरकारास द्यावा लागतो. ह्या जमिनीचा भाग ज्याला शेत असें म्हणतात, तो दुसऱ्यांस पोटमक्त्यानें देण्यास, धर्म करण्यास, विकण्यास अथवा गहाण टाकण्यास त्यांस पूर्ण अधिकार आहे. जावत्कालपर्यंत सारा त्यांजकडून बरोबर येत आहे. तावत्कालपर्यंत सरकारास ती जमीन त्यांजकडून घेतां येत नाहीं. हा सारा अमुक रुपयांपर्यंत असा हमेषा ठराव केलेला असतो. सरकारानें जी मुदत केली असेल, ती संपल्यावर सारा वाढविणें अथवा कमी करणें हा अधिकार सरकार स्वतः आपल्याकडेस ठेवितें. ही मुदत बहुतकरून तीस वर्षांची असते. वखरें पाहूं गेलें तर ही मुदत इतक्या दीर्घ काळाची आहे, कीं जर एखाद्या रयतेनें मनांत आणिलें, कीं आपण आपल्या जमिनींत कांहीं पैसा खर्च करून सुधारणाकरून त्याचा कांहीं कालपर्यंत भोगवटा घ्यावा, तरी देखील तें होऊं शकतें. एतद्देशीय संस्थानांमध्यें ही मुदत बहुतकरून इतक्या दीर्घकालाची नसतें. तेथें सामान्यतः गांवचे गांव अमुक वर्षें पावेतों मक्त्यानें दिले असतात. व जे लोक मक्ता घेतात, ते विहीर तलाव वगैरे बांधण्याच्या कामीं कुळांस मदत करून त्यांपासून जो अधिक फायदा निष्पन्न होईल तो ते उभयतां वांटून घेतात.

**जमीनदारी पद्धत**- ह्या पद्धतींत जमिनीचे भाग फारच मोठमोठे केलेले असतात. ते इतके, कीं त्यांत कित्येक गांवांचाही समावेश होतो, असे भाग अमुक साऱ्यानें वंशपरंपरा सरकारांतून ज्या लोकांस मिळाले

आहेत त्यांस जमीनदार असें म्हणतात. हे जमीनदार मोठमोठाले बनून त्यांजपाशीं जमीन इतकी विपुल असते कीं, ती पोटमक्त्यानें लहान लहान असामींस पाहिजे त्या साऱ्यानें पाहिजे तितकीं वर्षें त्यांस देतां येते. त्यांस स्वतः जो सारा सरकारांत भरावा लागतो, तो हमेषा एकसारखाच असल्यामुळें या लोकांस असे पोटमक्ते देण्यापासून मोठे फायदे राहतात. सरकारच्या व रयतेच्या दरम्यानचे हे लोक बनून जातात. ही जमीनदारीची पद्धत प्रथम लार्डकार्नवालीस यांनीं बंगाल्यामध्यें सुरू केली.

**या दोन पद्धतींत चांगली कोणती या विषयीं थोडें निरूपण करितों**— रयतवारी पद्धतींत रयतेस असें वाटतें कीं, जी जमीन मी अनुभवीत आहें, तिचा मालक मी आहें. म्हणून एकाद्या जमीनदाराचें कूळ बनून केवळ भाडोत्री प्रमाणें काम न करितां तो मालकाप्रमाणें आपल्या जमिनीवर मेहनत करून उत्पन्न जास्त वाढवितो. त्याची जमीन लहान आटोपशीर असल्या कारणानें त्यास सावकाराची तत्संबंधीं गरज लागत नाहीं. सरकारचेंच प्रत्यक्ष कूळ तो असल्यामुळें, त्यास ठरलेला सारा सरकारासच द्यावा लागतो. मधल्या मनुष्याची त्यास आवश्यकता रहात नाहीं. शेतावर मालकी त्याचीच असल्याकारणानें तो त्याजवरच मुलंबायकांसुद्धां स्वतः कष्ट करितो. त्यास मजुरांची फारशी गरज लागत नाहीं. जमीनदारी पद्धतींत जमीन विस्तीर्ण व अफाट असून एकाच मनुष्याकडे असल्याकारणानें त्यास स्वतःच ती सर्व जमीन कसतां येत नाहीं. ती त्यास दुसऱ्या लहान मोठ्या असामींस द्यावी लागते. असें करितांना तो या पोट असामींपासून आपल्यास जितका फायदा होऊं शकेल तितका करून घेईल, हें उघडच आहे. कोणत्याही असामीकडे सामान्यतः तो जमीन फार वर्षें ठेवित नाहीं, यामुळें त्या असामीचें मन तिकडे न लागून, तो केवळ आपला गुजारा होईल इतकेंच कष्ट त्या जमिनीवर करितो. जास्त पैसा खर्च करून त्या जमिनींत नवी सुधारणा करूं शकत नाहीं. ही वर लिहिलेली स्थिति हल्लीं बंगालयेथील कुळांची झाली आहे. अशीच स्थिति आयरलंड म्हणून एक देश आहे, तेथील लोकांची झाली आहे. ते लोक अति दरिद्री असून जमीनदारांच्या जुलमानें अगदीं त्रस्त झाले आहेत.

---

# भाग ४

## रोजमुरे.

**रोजमुरे**— मजूरलोकांनीं केलेल्या श्रमाबद्दल जो पैसा अगर धान्य मिळतें, त्यांस रोजमुरे म्हणतात. या देशांतील कामाठी लोकांस काम होतांच सायंकाळीं रोजमुरे देतात; कारकून वगैरे लिहिणारे यांस रोजमुरे महिना अखेर मिळतात; कितीएकांस तीनमहिन्यांनीं मिळतात; कितीएकांस वर्षानें मिळतात. कारकुनांस पगार त्यांच्या लिहिण्याच्या श्रमाकरितां देतात, वस्तुतः दुसरें कांहीं कारण नसतें. म्हणून रोजमुरे व पगार यांमध्यें फरक अगदीं नाहीं, हें स्पष्ट आहे.

मजुरांस धान्य वगैरे मालाबद्दल पैसे दिले तर ते त्यांस जास्त सोईकर होतात. कारण पाहिजे तो जिन्नस घेण्यास त्यांस विशेष श्रम पडत नाहींत. मनुष्य आपणास लागणारें अन्न, वस्त्र व इतर पदार्थ मिळविण्यासाठीं परिश्रम करीत असतो. त्यासाठीं जें त्यास मिळतें त्यासंच खरे रोजमुरे म्हणतात. जर कापूस व धान्य हीं जास्त महाग झालीं तर मजुरांचे रोजमुऱ्यांचे दर कमी केल्यासारखेंच होतें, कारण त्यांस मिळणाऱ्या मजुरीच्याच पैशानें कापूस व धान्य विकत घेतांना ते कमी मिळतील. तसेंच जेणेंकरून माल सवंग मिळूं लागतो, तेणेंकरून त्यांचे रोजमुरे वाढल्यासारखे होतात; कारण मजुरीच्या पैशानें त्यांस माल जास्त मिळतो.

लोकांना आपल्या श्रमाकरितां दररोज जे पैसे मिळतात, त्यांहून जास्त शेंकडा कांहीं पैसे मिळतील, तर आपण तितक्यानें जास्त सधन होऊं असें वाटत असतें; परंतु मालाची किंमत तितकीच वाढल्यानें पूर्वींपेक्षां ते जास्त सधन होणार नाहींत, हें उघड आहे.

**श्रमाची उत्पादकता जास्त होणें, हें प्रत्येकांस फायदेशीर होय.**— हिंदुस्थान देशांत कापडाचा खप उत्तरोत्तर जास्त होत आहे; याचें कारण मांचेस्तरचे लोक यंत्रांच्या मदतीनें थोडे श्रम करून विपुल कापड उत्पन्न करितात; यामुळें हिंदुस्थानांतील हातांनीं कापड विणणाऱ्या कोष्ट्यांपेक्षां त्यांस आपला माल सवंग विकितां येतो. यामुळें विलायती काप-

ड गरीब लोकस्थळीं जास्त घेऊं लागले आहेत. परंतु त्यांस तो माल स-
वंग मिळाल्यामुळें पैसा पूर्वीपेक्षां जास्त पडत नाहीं. हीच गोष्ट इतर विलाय-
ती मालास लागू पडते. एकंदरीत यंत्रकलेमध्यें इंग्रजलोक वाकबगार आहे-
त, यामुळें श्रमाची उत्पादकता इकडीलपेक्षां जास्त वाढल्यानें इकडील जास्त श्र-
माचा व महाग माल न खपतां, विलायती माल जास्त खपतो, हें हल्लीं स-
र्वांस अनुभूत आहे.

**सर्व मजुरांचे रोजमुरे वाढविणें झाल्यास, मालाचें उत्पाद-न सवंग रीतीनें झालें पाहिजे; अशा प्रसंगीं मात्र मजुरांचे रोज-मुरे वाढविणें शक्य आहे.-** माल महाग झाला म्हणजे व्यापाऱ्यांचा नफा होतो, परंतु माल विकत घेणाऱ्यांचें मोठें नुकसान होतें; कारण पूर्वीपे-क्षां त्यांस खरवाचे पदार्थ व अवश्य लागणारें धान्य वगैरे पदार्थ कमी मिळूं लागल्यानें, गैरसोय सोसावी लागते. परंतु तोच माल विपुल होईल, तर वि-कत घेणाऱ्यांचा नफा होतो. माल सवंग झाल्यानें व्यापारांत तोटा होत नाहीं कारण कमी श्रमानें पुष्कळ माल उत्पन्न करण्याची युक्ति जर निघेल, तर पूर्वीपे-क्षां माल विपुल उत्पन्न होऊन मजुरांचे रोजमुरे वाढतील, व तेणेंकरून त्यांस पूर्वीपेक्षां जास्त नफा होईल. जरी व्यापारी लोकांस प्रत्येक नगावर कमी न-फा मिळाला, तरी पूर्वीपेक्षां माल जास्त खपूं लागल्यानें एकंदरीत पूर्वीपेक्षां जास्त नफा होईल. यावरून **मालाची वृद्धि व मालाची सवंगाई, यांचा कल लोकांचा नफा करण्याकडे असतो, व हीच लोकां-स पूर्वीपेक्षां जास्त सधन करण्याची एक खरी युक्ति आहे.** हें वरील उपपादनावरून सिद्ध होतें.

**रोजमुऱ्यांमध्यें फरक कां पडतात-** निरनिराळ्या धंद्यांमधील मजूर लोकांच्या रोजमुऱ्यामध्यें फरक कां पडतो? या प्रश्नाची समजूत होणें हें मोठें महत्वाचें आहे. कांहीं लोकांना जितका रोजमुरा मिळतो, त्याच्या शतप-ट किंबहुना हजारपट जास्त इतर लोकांस मिळतो, व अशा प्रकारें रोजमु-ऱ्यांमध्यें फरक असण्याचें कारण, जन्मापासूनच कित्येक लोकांची इतरांपे-क्षां मानसिक शक्ति व शारीरिक शक्ति जास्त असते, व त्यांस विद्येचा व अ-नुभवाचा लाभ जास्त मिळालेला असतो. अर्थातच असे लोक इतरांपेक्षां आ-पल्या धंद्यांत जास्त वाकबगार असतात, यामुळें त्यांस जास्त पैसा मिळणें हें

साहजिकच आहे. ज्यावेळीं बाजारामध्यें थोडा माल असतो, व विकत घेणारे फार असतात; त्यावेळीं त्या मालास चणचण येऊन अधिक किंमत येते. ह्या वेळीं तो माल उत्पन्न होण्यास लागणाऱ्या श्रमाची चणचण झाली, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. एकाद्या मालाची चणचण झाली असें दिसून आल्यास, तो माल जास्त उत्पन्न करण्यास, त्या कामामध्यें हुशार असे जास्त लोक ठेवावे लागतात. उदाहरणार्थ एक पेटी आपण विकत घेतली अशी कल्पना करा. असें केल्यानें आपण सुताराच्या श्रमाचा उपयोग केला असें होतें; व याप्रमाणेंच जर पुष्कळ लोक पेट्या विकत घेऊं लागतील, व त्या तयार करणारे सुतार कमी असतील, तर ते लोक जास्त मजुरी मागतील. हें उघड आहे. आतां जे लोक पेट्या विकतात ते म्हणजे नेहमीं सुताराकडेच पैसे देतात, असें नाहीं; पहिल्यानें भांडवलवाला त्या पेट्या विकत घेऊन, आपल्या दुकानामध्यें विक्रीकरितां आणून ठेवितो; व अशी चणचण उडेल त्यावेळीं विकतो. अशावेळीं तो पेट्या जास्त तयार करण्याबद्दल आणखी अधिक लोक कामावर ठेवितो. यावरून **मालाची चणचण व श्रमाची चणचण हीं जरी अगदीं एक नाहींत, तथापि अगदीं जवळजवळचीं आहेत,** असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं; म्हणून मालाचा खप व त्याची भरती ह्यांच्या नियमानें त्यास ज्याप्रमाणें किंमत अधिक किंवा कमी येते; त्याप्रमाणेंच रोजमुऱ्याचे नियमाची गोष्ट आहे. मात्र ह्यावेळीं भांडवलाचा विचार मनांत आणावयाचा नाहीं, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

**मजूर लोकांना ज्या मानानें शारिरिक व मानसिक शिक्षण मिळालें असतें; त्या मानानें त्यांच्या रोजमुऱ्यांमध्यें कमजास्तीपणा होतो:-** ज्यांची प्रकृति मात्र सुदृढ असते; परंतु ज्यांचे आंगीं कौशल्याचा अभाव असल्यामुळें, जे साधारण प्रकारची कामें करण्यास मात्र समर्थ असतात, अशा मजुरांस रोजमुरेही साधारण प्रकारचे मिळतात. जास्त रोजमुरे मिळावयास मजुरांचे आंगीं **ज्ञान** व **चातुर्य** हीं अवश्य लागतात.

**रोजमुऱ्यामध्यें फरक कां पडतो ह्याचीं कारणें अडाम स्मिथ यांणीं ठरविलीं आहेत तीं:-**

**(१) स्वतः धंद्याचा बरेपणा किंवा वाईटपणा:-** एकादा धं-

दा इतर धंद्यांपेक्षां चांगला व सुकर असा लोकांस वाटल्यानें, सामान्य रोजमुरे घेऊन त्यांत शिरण्याची त्यांची प्रवृत्ति असते; पहा. कीं, खाटिकाच्या धंद्यापेक्षां आरमारामध्यें व इतर सरकारी कामामध्यें लोकांस फारच कमी पैसा मिळत असतो; परंतु सरकारी कामांत अधिकार हातीं असतो, मान मिळतो, व तीं कामेंही जास्त सुलभ असतात; यासाठीं या कामावर लोक कमी पगार घेऊन राहण्यास खुष असतात. खाटिकाचा धंदा क्रूर व ओंगळ असतो, यास्तव जास्त रोजमुरे मिळत असतांही, त्यांत शिरण्यास कोणी फारसें धजत नाहींत.

**(२) धंद्याचा सुलभपणा व त्याचे शिक्षणास लागणारा खर्चः**— पुष्कळ लोक गरीब असल्याकारणानें, आपल्या मुलांस फार दिवसपर्यंत शाळेंत ठेवून सुशिक्षित करण्याचें सामर्थ्य त्यांच्या आंगीं असत नाहीं; म्हणून अशीं मुलें सामान्य तऱ्हेच्या धंद्यास योग्य होऊन, त्यांस रोजमुराही त्याच मानानें मिळतो. परंतु वैद्यकी चित्रकला वगैरे उच्च प्रतीच्या धंद्याचें शिक्षण, चांगल्या रीतीनें मिळण्यास फार दिवस लागतात, व अगाऊ पुष्कळ पैसा खर्च करावा लागतो. व एकवार शिक्षण मिळालें कीं, लागलीच तो धंदा करण्यास लोक पात्र होतात. असें नाहीं; तर सुशिक्षित होऊनही त्या धंद्याचा चांगला परिचय होण्यास, त्यांस पुष्कळ दिवस अनुभव घ्यावा लागतो, व **अशा प्रकारें दीर्घकाल पर्यंत श्रम करणाऱ्या लोकांस, त्यांच्या श्रमाबद्दल जास्त पैसा मिळणें, हें अगदीं योग्य आहे.**

**(३) धंद्याचें शाश्वतत्व किंवा अशाश्वतत्वः**— कोणतीही एखादी नोकरी पुष्कळ दिवस टिकेल, अशी ज्यावेळीं मजुरांची खात्री असते, त्यावेळीं ती कमी पगार घेऊन देखील ते पतकरितो. उदाहरणार्थ हल्लीं सरकारी नोकऱ्या मिळविण्यास लोक मोठे खुषी असतात; याचें कारण त्या पतकरिल्या असतां, पुनः दुसरीकडे नोकरी पहाण्याची गरज रहात नाहीं, अशी त्यांची खात्री असते; म्हणून अशा नोकऱ्यांवर कमीपगार घेण्याचें कबूल करून, लोक राहतात. परंतु कांहीं धंदे फार दिवस टिकणारे नसतात. उदाहरणार्थ आंबी वगैरे लोकांचे धंदे पावसाळ्यांत मात्र चालू असतात, व ह्या चार महिन्यांतच त्यांना सबंध वर्षाच्या निर्वाहाची तरतूद करून ठेवणें भाग असतें. **अशा प-**

रिमितकाल पर्यंत चालणाऱ्या धंद्यामध्यें त्यांस जास्त रोजमुरे मिळतात; व असें घडणें हें स्वाभाविक आहे.

**(४) मजूर लोकांचा विश्वासूपणा:-** रत्नाचा व्यापार ज्या ठिकाणीं चालतो, त्या ठिकाणीं किंवा ज्यांच्या हुंड्या चालतात, अशा पेढीवाल्यांच्या पेढीवर नोकरी मिळणें ती तो मनुष्य विश्वासू असल्याशिवाय मिळत नाहीं. पहा, एखादा मनुष्य आपल्या कामांत मोठा हुशार आहे; परंतु तो दगलबाज आहे असें समजलें जाईल, तर अशा प्रकारच्या महत्वाच्या नोकरीवर त्यास कोणीही ठेवणार नाहींत; निदान त्यामध्यें त्यास व्यवस्थापक तरी कोणी नेमणार नाहींत. कारण अशा धंद्यामध्यें नोकरी करण्यास विश्वासूकच मनुष्य असावा लागतो. आतां ह्यावरून प्रामाणिकपणा असल्यानेंच जास्त रोजमुरे मिळतील असें नाहीं; तथापि तसें होण्यास तो एक कारण आहे.

**(५) धंद्यामध्यें यश मिळणें, किंवा न मिळणें, ह्याचा जसा संभव किंवा असंभव असेल, त्या मानानें रोजमुऱ्यामध्यें फरक पडतो:-** पहा, कीं सरकारी कचेऱ्यांत किंवा पेढीवर जे कारकून लोक असतात, त्यांच्या हुशारी प्रमाणें त्यांस पगार मिळत असतो. परंतु वैद्यकीचा किंवा वकिलीचा धंदा करणाऱ्या लोकांस त्या त्या कामामध्यें त्यांस यश आल्यावांचून, जास्त पैसा मिळत नाहीं; यामुळें ते धंदे सोडण्याचा प्रसंग येतो.

**मालाची किंमत चढल्यानें रोजमुरे वाढतात कीं काय:-** मालाची किंमत चढल्यानें रोजमुऱ्याचे दर वाढतात, असें केव्हां केव्हां लोक म्हणत असतात; परंतु देशांतील रोजमुऱ्याची एकंदर रक्कम आणि मजूर लोक यांजमधील प्रमाण जर न बदलेल, तर कोणत्याही उपायानें त्यांच्या स्थितीची शाश्वत सुधारणा होणार नाहीं. हें तत्व ज्यांच्या ध्यानांत येईल, त्यांस वरील प्रश्नाचें बीज सहज कळणार आहे. आतां मालाची किंमत वाढल्यानें रोजमुरे वाढतात, कीं काय याचा विचार वरील तत्वाच्या अनुरोधानें करूं. समजा, कीं चंदेरी पागोट्यांची फारच चणचण झाली आहे; म्हणजे जोतो तीं विकत मिळावीं अशी इच्छा करितो, तर कांहीं वेळ पावेतों त्या मालाचा खप आणि त्याची भरती यांजमधील समता त्या पागोट्यांची किंमत जास्त वाढल्यानें होईल. व किंमती वाढल्यामुळें पागोट्यांमध्यें नफाही विपुल होईल; आणि अशा प्रसंगीं कारखानदारांचें लक्ष जास्त पागोटीं उत्पन्न करण्याकडे लागेल; अर्थात् पागोट्यांच्या व्यापारांत ते आपलें

भांडवल हीं जास्त घालूं लागतील; आणि तेणेंकरून मजूरदारांस पूर्वीपेक्षां जास्त रोजमुरे मिळूं लागतील. यावरून **मालाची किंमत वाढली म्हणजे रोजमुरे वाढतात,** असें जें वर प्रतिपादन केलें आहे, त्याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे, असें समजतां येईल. परंतु ही स्थिति कायम राहणार नाहीं; कारण जर इतर व्यापाऱ्यांस व त्यांचे मजूरदारांस असें कळेल कीं; हल्लीं पागोट्यांचे व्यापारांत नफा बराच होतो, तर ते व्यापारीही आपापलें भांडवल याच व्यापारांत घातल्यानें आपणांसही तसा नफा मिळेल, अशा आशेनें पागोटीं जास्त उत्पन्न करूं लागतील; मग अशी चढाओढ सुरू झाल्यामुळें गरजेपेक्षां जास्त पागोटीं तयार होऊन, मजूरदारांचे दरही वाढतील हें खरें; परंतु पागोटीं पुष्कळ झाल्यामुळें पूर्वीइतकीच त्यांची किंमत न राहतां तीं सवंग विकलीं जातील. आणि ह्यामुळें त्यांच्या स्वतांच्या देखरेखीचा व भांडवलाचा जो साधारण नफा पूर्वी मिळत होता तितकाही मिळेनासा होईल. म्हणून मालाची किंमत जसजशी उतरूं लागेल, तसतसा नफा व रोजमुरे कमी झाले पाहिजेत. आतां अशानें **रोजमुरे कमी कां व्हावेत याचा विचार करूं.** नवीन माल उत्पन्न करण्याचें बंद झालें; आणि कारखाने वाल्यांस चांगलासा नफा मिळेनासा झाला; म्हणजे माल कमी उत्पन्न करावा असें त्यांस वाटूं लागतें. अर्थात असलेल्या मजूरदारांस भर दिवसाचे रोजमुरे ते देणार नाहींत. अशानें रोजमुऱ्यावर कसें कार्य होईल तें आपण पाहूं. प्रथमतः पागोट्याची किंमत वाढल्यामुळें पुष्कळ मजूर नफ्याच्या आशेनें जास्त पागोटीं तयार करूं लागतील, परंतु पागोट्यांची भरती जास्त झाल्यामुळें; तो व्यापार मंदावेल, अशा प्रसंगीं भांडवलवाले त्यांची भरती कमी करण्यास यत्न करितील; यामुळें इतक्या मजूरदारांची गरज राहणार नाहीं. म्हणून पुष्कळ मजूर बेकार होऊं लागतील, अशानें त्यांचे रोजमुरेही कमी होणार. बरें या प्रसंगीं **जर कमी रोजमुरे कराल तर आम्हीं काम करणार नाहीं,** असें जर सर्व मजूरदारांनीं एकजुटीनें मनांत आणिलें, तर भांडवलवाल्यांस पागोट्याच्या व्यापारांत नफा होत नसून, मजुरांचे रोजमुरे वाढविणें भाग पडेल, तर कारखाना बंद करावा लागेल. आणि अशा व्यवस्थेमुळें **हजारों मजूरदारांस रिकामें बसण्याचा प्रसंग येईल.**

# भाग ५

## भांडवलाचा नफा.

भांडवल म्हणजे काय याची व्याख्या मागील प्रकरणांत केलेली आहे. आतां भांडवलाचा नफा व त्या संबंधीं कांहीं नियम या भागांत सांगतों. भांडवलाची योजना होण्यासाठीं देशांत अनेक धंदे चालू असावे लागतात. म्हणजे एकाद्या धंद्यांत तोटा झाल्यास त्यांतून भांडवल काढून, अन्य कारखान्यांत घालण्यास सोपें पडतें. एकंदरींत **कोणत्याही देशाची भरभराटी होण्यास कृषि, शिल्प व व्यापार अशीं तीनही साधनें असलीं पाहिजेत.** व या मध्यें चांगलें साधन कोणतें याचा निर्णय करणें हें सोपें नव्हे; कारण देशाची जसजशी स्थिति असते, त्या त्या प्रमाणें त्या त्या देशीं ते निरनिराळे उद्योग चालावयास भांडवलाचा अंश निरनिराळ्या मानानें लावितात. या प्रमाणें भांडवलाची योजना करण्याच्या निरनिराळ्या रीति आहेत. अमेरिका-खंडांत अथवा नवीन वसलेल्या देशीं जमीन थोडक्या मोलानें मिळते. लोक थोडे जिकडे तिकडे राहिलेले असतात; भांडवलाची कमती असते; कारण तेथें रोजमुरा मोठा असल्यामुळें कोणाही रोजमुराच्या पदरीं चार पैसे झाले म्हणजे त्यास जमीन पाहून, ती घेऊन शेतकीचा अटाला सुरू करण्याची उमेद येते. याप्रमाणें तेथें फार करून शेतकीचीच चाल होऊं लागते. अमेरिकेंत तर संपत्ति वाढत चालली आहे, तथापि तेथील लोकांस जो तयार झालेला माल लागतो, तो बहुतेक ते बाहेरून घेतात; यांत त्यांचा नफा आहे. ते आपल्याकडे अवघा माल तयार करावयास कारखाने घालीत नाहींत. त्यांजकडे भांडवलाची कमती असेल, म्हणूनच ते कारखाने घालीत नसतील, असें समजूं नये. तर भांडवलाची वहिवाट करावयास शिल्पकामापेक्षां दुसरें अधिक नफ्याचें काम असतें, म्हणून ते कारखाने घालीत नाहींत.

इंग्लंद देशांत तर लोक पुष्कळ असतात, आणि जमीन थोडकी असते; म्हणून इकडचा तयार झालेला माल देऊन त्याबद्दल अमेरि-

केचें धान्य घेणें यांत इंग्लिश लोकांचें हित आहे. असा विनियम देशादेशां-त चालू असल्यानें सर्वांचा नफा होतो. कारण एखादा देश कृषिकर्माविषयीं फार चांगला असतो. शिल्पकर्म चांगल्या रीतीनें चालायास योग्य असा ए-कादा देश असतो. एक धान्यादिक देतो; एक कलाकौशल्यानें केलेले पदा-र्थ देतो; या प्रमाणें उभयतांचा व्यापार चालतो; व असा व्यापार स्थिरू अ-सला म्हणजे एका देशांत जितक्या मालाचा खप असतो, त्यापेक्षां अधि-क माल तयार करण्याकडे भांडवलाची योजना झालेली असते; आणि त-हेतऱ्हेचे कसबानें जो माल तयार होतो, तो परमुलखीं पाठवून त्याबद्दल त्या त्या देशांतील माल घेतात, यांत नफ्याची गोष्ट आहे. कारण तो मा-ल त्या देशीं तयार करावयास जो खर्च बसतो, त्यापेक्षां कमी खर्चानें प-रदेशाहून आणितां येतो.

यावरून असें सिद्ध होतें कीं, जशी तारुण्यापासून प्रौढद-शेची प्रवृत्ति होते, तशी कृषिकर्मापासून शिल्प व व्यापार यांची प्रवृत्ति हो-ते. पूर्ववयांत शरीर जसें गरगरा वाढतें, तशी कृषिकर्माची केवळ वाढ होते. आणि प्रौढवयांत जसें शरीर जमून स्थिरदृढ होतें. तशी शिल्प व व्यापार इहीं करून कृषीचे आंगीं शक्ति व दृढता येते. **यावरून कृषिकर्म व्यापार व शिल्प यामुळें देशाची भरभराटी होते असें स-हज समजेल.** व अशा प्रकारच्या विविध धंद्याची देशांत सुरुवात असतां त्यांतून कोणत्या धंद्यांत भांडवलाची योजना व्हावी हें देशस्थि-तीवरून होत असतें. भांडवलवाले हे निरंतर ज्या उद्योगापासून फार न-फा होईल, अशा उद्योगाकडे आपलें भांडवल योजितात. आणि ज्या का-माची देशास गरज असते त्याच कामापासून फार नफा होतो हें उघड आहे.

देशांतील लोकांच्या गरजेचा आणि भांडवलवाल्यांच्या नफ्याचा कसा संबंध आहे, हें पाहूं.

**मनुष्यमात्रांच्या गरजा अनेकविध असतात:-** थोडा-सा विचार केला असतां असें लक्षांत येईल कीं, आपल्या जवळ एकच प्र-कारचा माल असेल, तर तेवढ्यानें आपली इच्छा तृप्त होईल, (गरज भा-गेल) असें नाहीं. जसें एकाद्याजवळ बटाटे पुष्कळ आहेत; परंतु दुसरें कां-हीं नाहीं, तर बटाट्यावर त्याची गरज भागणार नाहीं. तसेंच त्याच्याजवळ

अंगरखे पुष्कळ असले, तरी त्याची इच्छा तृप्त होणार नाहीं. तऱ्हेतऱ्हेचीं वस्त्रें (ऋतुमानाप्रमाणें गरम, तलम वगैरे) असावीं लागतात. फोटोग्राफरजवळ एकच प्रकारच्या तसबिरी असून उपयोग नाहीं. तसेंच एकच प्रकारचे पुष्कळ ग्रंथ असणें चांगलें नाहीं. या वरील उपपादनावरून इतकें लक्षांत येतें कीं, **मनुष्यमात्रांच्या गरजेचा कल नाना प्रकारच्या होण्याकडे असतो.** मनुष्याची एक प्रकारची गरज तृप्त झाली, कीं दुसरी लागलीच उत्पन्न होते. या स्थितीस **नानाप्रकारचा सिद्धांत (विविध गरजांचा सिद्धांत)** असें म्हटलें आहे, व हा अर्थ शास्त्रामध्यें मोठ्या महत्वाचा आहे. मनुष्यास ज्या ज्या गरजा उत्पन्न होतात, त्यांस कांहीं एक प्रकारचा स्वाभाविक क्रम आहे. जसें मनुष्यास प्रथम अन्नाची, नंतर वस्त्राची, वगैरे अशा क्रमानें अपेक्षा उत्पन्न होतात; म्हणजे प्रथम खावयास कांहींच नसलें म्हणजे भाजी-भाकरीची इच्छा असते. ती सफळ झाली म्हणजे भात, पोळी, लाडू वगैरेची इच्छा उत्पन्न होते. तसेंच खाण्याची चंगळ असली म्हणजे, चांगलीं वस्त्रेंप्रावर्णें मिळावीं, ही इच्छा उत्पन्न होते. तीं मिळाल्यावर चांगलें घर असावें असें वाटतें. ज्यास राहण्यास कांहींच नसतें, त्यास साधारण झोंपडी मिळाल्यास संतुष्ट असतो. जो झोंपडींत राहणारा असतो, त्यास मध्यम घर असावेंसें वाटतें. जो मध्यमघरामध्यें असतो, त्यास उत्तम हवेली असावी असें वाटतें. हवेली मिळाल्यावर तींत सर्व सामान (वाद्यें, पुस्तकें, टेबलें, खुर्च्या, बाकें, तेलें, अत्तरें वगैरे सुगंधी सामान) असावें असें वाटतें. असा अनुक्रम असतो. या अपेक्षानुक्रमाचा अगदीं ठोकळ मानानें सिद्धांत खालील प्रमाणें करितां येतो. **१ हवा, २ अन्न, ३ वस्त्र, ४ घर, ५ ग्रंथ, ६ अलंकार इत्यादि.** परंतु श्रीमंत मनुष्यांच्या इच्छेची परिमिति होणार नाहीं. त्यास 'निस्वोऽप्येक-शतंशतीदशशतं' या न्यायानें एक घर असलें, तरी दुसरें असावें असें वाटतें. कांहीं सरदार लोकांचीं चारचार किंवा पांच सुद्धां घरें असतात.

जर एकच जातीचा पुष्कळ माल उत्पन्न केला, तर त्यापासून नफा होत नाहीं; उलट नुकसान होतें. म्हणून प्रत्येक जिन्नस बेताचा उत्पन्न करून त्या पासून नफा करून घ्यावा.

**वस्तु केव्हां उपयोगी पडतात?** त्यांची आपणास गरज आहे किंवा नाहीं, ह्यावर हा वरील प्रश्न अवलंबून आहे. उदाहरण पाणी हा पदार्थ अत्यंत उपयोगी आहे, परंतु घरारवालीं झरे असून जमिनीस व भिंतीस लोणा चढला, तर त्यापासून रोग उत्पन्न होईल. म्हणून त्या ठिकाणीं तें उपयोगी न म्हणतां, उलट उपद्रवकारक आहे, असेंच म्हटलें पाहिजे. विहीर खणीत असतां झरा लागला तर तो उपयोगी आहे. परंतु कोळशाची खाण खणीत असतां झरा लागला तर तेथें तो उलट उपद्रवकारक आहे. कांहीं देशांत पाऊस अनियत काळीं व अनिश्चितपणानें (एखादेवेळीं अगदीं कमी व एकादेवेळीं अतोनात असा) पडतो. उदाहरण हिंदुस्थानांत चैत्र वगैरे महिन्यांत वळवाचा पर्जन्य पडतो; तो इतका कीं, नद्यांस व ओढ्यांस मोठे महापूर येतात; त्यांच्या वेगानें पूल व धक्के पडतात. त्यांच्या कांठांवरील गांवें, जनावरें व मनुष्यें इत्यादि वाहून जातात; अर्थात् त्या ठिकाणीं तें पाणी उपद्रवकारक आहे, असेंच म्हटलें पाहिजे. कारण ह्यावेळीं तें उपयोगी नसून उलट तें इतकें उपद्रवकारक आहे कीं, तें प्राणनाशासही कारण होतें. तेव्हां पाणी हें सर्वकाळ उपयोगी आहे, असें म्हणतां येत नाहीं, त्यावरून **ज्या काळीं व ज्या ठिकाणीं आम्हांस ज्या वस्तूची गरज असते व जी आम्हांस पाहिजे तितकीच मिळते** त्यावेळीं व त्या ठिकाणीं तीस आम्हीं उपयोगी म्हणूं.

आतां मालास संपत्तीचें स्वरूप येण्यासाठीं तो परिमित कां असावा, हें साहजिक रीतीनें समजेल. कारण 'मलये भिल्लपुरंध्री चंदनतरुकाष्ठमिंधनं कुरुते' चंदनाचें एखादें खोड मिळालें, तर आम्हांस मोठा आनंद होतो. परंतु मलयाचल पर्वतावर तें विपुल असल्यानें, चंदनवृक्षांचीं लाकडें जळणाऐवजीं उपयोगी पडतात.

**कोणत्या तत्वाविषयीं आपलें धोरण असावें:-** अर्थशास्त्रांतील कोणतें तत्व आपण लक्षांत आणावें, हें आपणांस समजलें पाहिजे. तें हें कीं, अनेकविध ज्या आमच्या गरजा त्या शक्य तितक्या पूर्ण करणें हें होय. ही गोष्ट कशी साध्य होईल; तर ती साध्य होण्यासाठीं सुरव्यतें करून कोणत्या गोष्टीची अपेक्षा किंवा गरज पडते, हें प्रथम समजावून घ्यावें; नंतर ती पूर्ण करण्यास मनुष्य यत्न करावा. वस्तु उत्पन्न केल्यानंतर जर ती उपयोगी न पडेल, तर ती उत्पन्न कर-

णें व्यर्थ होय. यास्तव वस्तूंची भरती, रवपाशीं प्रमाणांत असली पाहिजे. पहा, एकादा सुतार टेबलेंच अतिशय तयार करून ठेवील, व खुर्च्या थोड्या करील, तर कांहीं उपयोग नाहीं. तर खुर्च्या जास्त व टेबलें कमी केलीं पाहिजेत. तसेंच कोणत्याही मालाची जेव्हां अतिशयित गरज असते, तेव्हांच त्याची भरती केली पाहिजे. आणि कोणतीही वस्तु अतिशय (गरजेबाहेर) तयार न करण्याची खबरदारी ठेविली पाहिजे.

आतां दुसऱ्यापक्षीं विचार करूं. शक्य तितक्या कमी श्रमानें पदार्थ उत्पन्न करण्याविषयीं निरंतर आपला प्रयत्न असावा. कारण श्रम करणें हें दुःखकारक आहे. **गरजा पूर्ण करण्या विषयींचे जे प्रयत्न करण्यांत येतात, तत्संबंधीं जें शास्त्र त्यास अर्थशास्त्र म्हणावें.** आम्हांस ज्याची गरज लागते, तो पदार्थ संपादन करण्याविषयीं अगदीं जवळचा मार्ग कोणता, हें या अर्थशास्त्रापासून समजतें; सारांश ज्या योगानें अल्पस्व श्रम करून अतिशय संपत्ति मिळेल, असा हेतु असावा. व गरजांचा सिद्धांत मनांत आणावा; कारण लोकांस ज्या जिनसांची फार गरज असते त्यांची ते फार किंमत देतात. पहा, देशांत कापडाची फार कमताई झाली, आणि लोकांस कापडाची फार गरज लागली, यामुळें कापडाची किंमत चढून, त्या त्या व्यापारांत मोठा नफा मिळावा, अशी संधि आली. अशा समयीं ज्या लोकांस शेतकीच्या खटल्यांत थोडका नफा मिळत असेल, ते आपल्या भांडवलापैकीं कांहीं भांडवल कापडाच्या कारखान्यांत लावतील; यामुळें अधिक कापडें तयार होऊन, कापडाचा तोटा नाहींसा होईल. तें विकत घेण्याविषयीं; जी लोकांची चढाओढ, ती कमी होईल. असें झालें असतां, कापडाची किंमत उतरेल, व कापड तयार करणारांस जो नफा व्हावयाचा, तो कमी होईल; व शेतकऱ्याचे नफ्याचे बरोबरीनें होऊं लागेल. त्यापेक्षांही कमी होऊं लागला, तर शेतकऱ्यानें, जें भांडवल कापडें तयार करण्याच्या कामाकडे योजिलें होतें; तें तेथून काढून पुन्हा शेतकीकडे लावील.

**लोकसंख्येची व संपत्तीची वृद्धि झाल्यामुळें व्याजाचे दर उतरतात, याचीं कारणें काय याचें थोडक्यांत स्पष्टीकरण करितों:**— भांडवलवाल्यांस आपल्या भांडवलाबद्दल व श्रमाबद्दल जो फायदा मिळतो, तो भांडवल व श्रम यांच्या उत्तम स्थितीवर अवलंबून अस-

तो, म्हणजे वस्तुस्थिति आहे, तशी कायम राहून सारख्याच भांडवलानें व श्रमानें जर जास्त मालाचें उत्पादन होईल, तर रोजमुरे व व्याज हीं वाढतात. जसें कोणी आपल्याजवळील एकमण गव्हांचा व्यय करितांना, जर तो दीडमण गहूं उत्पन्न करील, तर शेंकडा पन्नास प्रमाणें भांडवल व श्रम यांवर नफा झाला, असें होतें; व हा नफा जमीन सुपीक असल्यानें होतो; परंतु जर त्याला पूर्वीपेक्षां कमी सुपीक जमीन घेऊन, त्यांत भांडवल व श्रम यांची योजना करावी लागेल, व सवामण धान्य उत्पन्न होईल तर त्याचा नफा पूर्वीपेक्षां शेंकडा २५ नीं कमी होईल.

**लोकसंख्या जास्त वाढल्यामुळें कमकस जमिनीची लागवड करून, जास्त धान्य उत्पन्न करावें लागतें,** यामुळें लागवडीची मर्यादा खालीं उतरते; म्हणून रोजमुरे व नफा हीं कमी होतात, आणि सारा वाढतो. कारण जास्त लागणारें धान्य उत्पन्न करण्याकरितां, नापीक जमिनीची लागवड करावी लागते, त्यांत जास्त श्रम व जास्त भांडवलाची अपेक्षा लागते, म्हणजे भांडवल व श्रम यांपासुन संपत्युत्पादन कमी होतें; यामुळें नफा व रोजमुरे उतरतात.

**मालाची किंमत वाढल्यानें नफा जास्त होत नाहीं:**– किंमती चढल्यानें नफा जास्त होईल, असें समजणें चुकीचें आहे. केव्हां केव्हां मालाचा खप अकल्पित होऊन जातो. यामुळें नफा जास्त होतो, व रोजमुरे वाढतात, हें खरें आहे. परंतु भांडवलाच्या व श्रमाच्या चढाओढीमुळें वाढलेला नफा व रोजमुरे कमी होतात. ज्या ठिकाणीं व्यापार निष्प्रतिबंध चालतो, त्या ठिकाणीं किंमतीचें नियमन उत्पादनास लागणाऱ्या खर्चानें होतें. किंमत चढल्यानें होत नाहीं. मागील भागांत किंमत जास्त वाढल्यानें रोजमुरे वाढत नाहींत, असें स्पष्ट करण्यांत आलें आहे. तीच गोष्ट नफ्यास लागू पडते. जसें कापसाची भरती कमी झाल्यामुळें, त्याचे उत्पादनास लागणारा श्रम वाढतो या प्रसंगीं अथवा कापसावर जास्त कर बसविला असतां, त्या प्रसंगीं किंमती चढतात; परंतु नफा कांहीं वाढत नाहीं. तात्पर्य उत्पादनास लागणाऱ्या खर्चाची वृद्धि झाल्यास, नफा कमी होण्याचा कल असतो.

अमेरिकेंतील लढाईचे वेळीं कच्चा कापूस अगदीं कमी झाल्यानें वस्त्रें महाग झालीं; यामुळें कापड तयार करणारांचें नुकसान झालें, व रोज-

मुज्याचे दर कमी झाले त्यावरून किमती वाढल्यानें नफा जास्त होत नाहीं.

**उत्पादनाच्या न्यूनतेचा सिद्धांत**- याच प्रमाणें पूर्वी लागवडींत आलेल्या जमिनींपासूनच जास्त लागणारें धान्य उत्पन्न करण्याची जरूर लागल्यास, वरील प्रमाणेंच कार्य घडतें; मूळच्या जमिनीमध्यें जास्त धान्य उत्पन्नकरण्यासाठीं दुप्पट श्रम व भांडवल यांची योजना केली असतां, त्यापासून दुप्पट धान्याची उत्पत्ति होत नाहीं; जर उत्पन्नवृद्धि भांडवलवृद्धीशीं प्रमाणांत असती; तर सर्व जगाची स्थितिही अर्थशास्त्रदृष्ट्या हल्लीं आहे याहून अगदींच निराळी झाली असती; म्हणजे एका शेतांतील उत्पन्न सर्व राष्ट्रास भरपुर झालें असतें.

**एकाच देशांतील समकालीन सर्व व्यापारांतील भांडवलाच्या व्याजाचा दर सारखा असतोः**- हें प्रतिपादन सकृद्दर्शनीं मोठें चुकीचें दिसतें. कारण निरनिराळ्या व्यापारांत फायदा कमजास्त होतो, तर व्याजाचे दर कमजास्त असावेत, असें म्हणणें भाग पडतें; परंतु या निरनिराळ्या व्यापारांत जोखमीचें मान कमजास्त असतें; व त्यांत देखरेख ठेवण्याची व्यवस्था राहण्यास जास्त खबरदारी घ्यावी लागते; यावरून ज्या व्यापारांत इतर व्यापारापेक्षां जोखीम जास्त व खबरदारी राखण्याचें श्रम जास्त लागतात, त्या व्यापारांत नफाही जास्त मिळणें साहजीक आहे. तेव्हां जो जास्त फायदा या जास्त जोखमीबद्दल व जास्त देखरेखीबद्दल मिळतो, तो एकंदरींतून वजा जातां व्याजाची रक्कम सर्व व्यापारांतील सारखीच असतें, असें ठरतें.

---

# भाग ६.

## व्यापार-श्रेणी.

**जातिभेदामुळें निरनिराळ्या श्रेणीची (एकच धंदा करणाऱ्या पुरुषांची) व्यवस्था कशी फायदेशीर होते त्या विषयीः**- या देशांतील लोकांत धंद्यावरून जातिभेद असल्यामुळें त्या त्या जा-

तींतील लोकांच्या उद्योगधंद्यास त्यापासून फार मोठा फायदा आहे.

प्रथम गोष्ट अशी आहे कीं, प्रत्येक जात ही एक श्रेणीच आहे. ह्या मुळें त्या जातीचा जो विशेष धंदा असेल, त्या धंद्याचें योग्य शिक्षण त्या जातीच्या मुलांना मिळतें. शिवाय त्यांनीं व्यापारधंदा कसा चालवावा, ह्या विषयीं नियमही ती जात ठरविते. तसेंच जेवणावळीच्या योगानें, व जातजमात भरविल्याच्या योगानें, तींतील एकमेकांविषयींचा प्रेमभावही वाढतो. हिंदुस्थानच्या मध्यकालीन[1] स्थितींत कारागिरीचीं प्रख्यात कामें तशींच तेथील मलमल, रेशमी कापड, जरतार, रत्नजडीत नक्षीदार हत्यारें व जडावाची उत्तम कामें हीं सर्व त्या श्रेणींच्या (जातींच्या) च योगानें पूर्णदशेस आलीं. हिंदुस्थानाच्या पुष्कळ भागांत अद्यापि अशा प्रकारच्या श्रेणी उत्तमस्थितींत आहेत, अशा आढळतात. उदाहरणार्थ- मुंबई इलाख्यांतील वायव्येकडील प्रांतांत, निरनिराळ्या कारागिरांच्या कुटुंबांच्या मुख्यांचे त्यांच्या त्यांच्या श्रेणीप्रमाणें निरनिराळे वर्ग बांधिले आहेत. **त्या श्रेणीपासून फायदे**:- अशा श्रेणीमुळें कारागीर-लोकांस आपसांत अन्यायानें चढाओढी करितां येत नाहींत; व दुसऱ्या धंद्यांतील लोकांशीं जर कांहीं तंटा उपस्थित झाला, तर त्या श्रेणींना आपल्या लोकांची बाजू घेऊन भांडतां येतें. उदाहरणार्थः- इ० सन १८७२ मध्यें अमदाबाद येथील कित्येक गवड्यांनां काम मिळेनासें झालें. हे लोक कधीं कधीं मोठ्या पहाटेस उठत; व कामाच्या वेळेपेक्षां जास्त वेळ कामकरून अधिक रोजमुरा मिळवीत. परंतु आम्हांला काम मिळत नाहीं; अशी जेव्हां कित्येक कुटुंबांनीं तक्रार केली, तेव्हां गवड्याचे जातवाले एकत्र जमून, त्यांनीं ठराव केला कीं, ज्या अर्थी सगळ्यांना पुरेसें काम मिळत नाहीं, त्या अर्थी कोणालाच कामाच्या वेळाबाहेर कामकरूं देऊंनये. त्याच शहरांत इसवीसन १८७२ मध्यें कापडकऱ्यांनीं पांजण देणाऱ्याची (कापसास खळ लावणाऱ्यांची) मजूरी कमी करावी, अशाविषयीं प्रयत्न चालविला. तेव्हां पांजण देणाऱ्या लोकांनीं (तांड्यांनीं) कमी मजूरीवर काम करावयाचें ना-

---

[1] इसवी सनाच्या आरंभापासून तों युरोपियन लोक हिंदुस्थानांत येऊं लागले, तेव्हांपर्यंत हिंदुस्थानाची स्थिति.

हीं, असा कट करून सुमारें दीडमहिना पावेतों धंदा सोडून दिला. शेवटीं त्या दोन्हीं श्रेण्यांनीं त्यापुढें मजूरीचा दर अमुक असावा, असें ठरवून छापील कागदावर करारनामा केला; आणि तंटा मिटविला. अमदाबादेमध्यें वरिष्ट श्रेणीपैकीं प्रत्येक श्रेणींतील लोक आपल्या धंद्यांत कोणी उमेदवार शिकूं लागला म्हणजे, त्याजपासून फी घेतात, हें फीचें उत्पन्न, व जातीचे नियम मोडणाऱ्यांपासून जो दंड घेतात, त्याचें उत्पन्नही त्यात्या जातींतील लोकांनां जेवणावळ देण्यांत, अगर फार गरीब कारागीर, अथवा त्यांचीं अनाथ मुलें ह्यांना मदत करण्यांत खर्च करितात. सुरतेंत ह्या श्रेणीच्या पैसा जमविण्याची एक नामी युक्ति आहे. ती ही कीं, एकादा दिवस सुटीचा समजून त्या दिवशीं आपल्या जातींतील लोकांनीं एका दुकाना शिवाय सर्व दुकानें बंद ठेवावीं, असें त्या ठरवितात. जें दुकान उघडें ठेवावयाचें, त्याचे हक्काचा त्या लिलांव पुकारतात; आणि ज्या रकमेला तो हक्क कोणी घेईल, ती रकम जेवणावळीकडे खर्च करितात. ह्या श्रेणी आपणांपैकीं कोणाही मनुष्यास उपाशीं मरूं देत नाहींत. अशा रीतीनें परस्परांची पत राखण्यास युरोपांत गोरगरीबांच्या संरक्षणाकरितां केलेल्या कायद्याच्या योगानें जसें त्यांचें संरक्षण होतें, तशा प्रकारचें हिंदुस्थानांतील गोरगरीब लोकांचें संरक्षण होण्यास, हे श्रेणीचे नियम उपयोगीं पडतात. हिंदूच्या कोणत्याही समाजांतील लोकांस आपणांपैकीं कोणास अति कडक शिक्षा करावयाची म्हटली म्हणजे, त्याला ते जातीबाहेर टाकितात. अशाच श्रेणी युरोपखंडांत स्थापन झाल्या आहेत, त्यांजकडून कोणतीं कामें होतात, या विषयीं थोडेंसें या भागांत निरूपण करितों.

**काम बंद पाडण्याची भीति घालणें:—** अमुक रोजमुरे घेऊन काम करूं, अन्यथा करणार नाहीं, अशी भीति घालून मालकांनीं जास्त रोजमुरे द्यावे, किंवा आपलें जें काय म्हणणें असेल तें ऐकावें, ह्या हेतूने सर्व मजूर एक जुटीनें आम्हीं अमुक दिवशीं काम करणार नाहीं, अशी भीति घालितात; **त्यासच काम पाडणें असें म्हणतात.** याप्रमाणें अमुक रोजमुरे घेऊन काम करा नाहीं तर तुम्हांस कमी करूं अशी भीति कारखान्याचे मालक घालितात. त्यास **कारखाना बंद करण्याची भीति घालणें म्हणतात.** असें उभयतांकडून होण्यांत का-

यदेशीर अपराध होत नाहीं. जर मनुष्य बांधला गेला नसेल, तर पाहिजे त्या दरानें काम करण्यास मजूरदार मुखत्यार आहे. व मालकही पाहिजे त्या दरानें मजूरदाराकडून काम घेण्यास मुखत्यार आहे. मात्र उभयपक्षीं करारमदार जाहले असल्यास, ते त्यांस मोडता कामानयेत; तसें जाहल्यास मात्र कायदेशीर गुन्हा होईल.

**काम पाडण्याचे परिणामः—** अशा प्रसंगीं रोजमुरे न मिळाल्यामुळें मजूरांस उपाशी मरण्याचा प्रसंग येतो. मालकाचाही कांहीं अंशीं तोटा होतो. एकंदरींत अशी भीति घालणें हें उभयपक्षीं मौर्ख्य होय.

काम पाडणाऱ्या लोकांनां दुसऱ्या मजूर लोकांस आपल्या ठिकाणीं काम न करण्याची भीति घालण्याचा अधिकार नाहीं. जर कमी दरानें अन्य लोक काम करण्यास कबूल असतील, तर त्यांस तसें करण्याचा अधिकार आहे. व स्वप आणि भरती यांच्या तत्वानें कमी दरानें रोजमुरे देऊन, काम करून घेणें हें मालकांचें कर्तव्य आहे; यास्तव जर त्यांस कमीदरानें मजूर मिळतील, तर त्यांजकडून त्यांनीं काम करून घ्यावें; परंतु जर हे काम बंद करणारे लोक. आपल्या ठिकाणीं येऊं इच्छिणाऱ्या मजुरांस दहशत घालतील, तर ते अपराधी ठरतील. कारण पाहिजे त्या दरानें काम करण्याचा हक्क प्रत्येक इसमास आहे; त्यास प्रतिबंध होणें हें सार्वजनिक नुकसान होय. हीच गोष्ट मालकांनीं कामबंद करूं अशी भीति घालणें यासही लागू पडते.

जेव्हां कोणत्याही कारखान्यांतील मजूर लोक कमी पगार मिळतो म्हणून काम बंद पाडण्याची भीति घालितात; आणि मालकांना त्याच दरानें तितके चांगलें काम करणारे लोक मिळणें शक्य नसतें, तेव्हां त्यांचे रोजमुरे वाढविणें त्यांस भाग पडतें; परंतु जर त्या सारखेच काम करणारे इतर मजूर लोक पूर्वीच्या रोजमुऱ्याच्या दरानें मिळतील, तर काम बंद पाडणाऱ्या मजुरांची तसें करण्यांत मोठी चुकी आहे, असें सिद्ध होतें. पुढें नफा जास्त मिळेल या आशेनें आपल्याजवळील माल जे व्यापारी विकीत नाहींत, त्यांची आणि यांची स्थिति एकच होय; जर ही त्यांची चुकी आहे तर त्यांणीं या बद्दल झालेलें नुकसान सोसलें पाहिजे; आणि त्यावेळीं इतर लोक आप-

ला माल विकितात; त्यांस नफा होतो. आपला माल त्यावेळीं विकला नाहीं म्हणून दुसऱ्यालाही नफा होऊं नये, म्हणून माल विकण्यास प्रतिबंध करतील, तर हें कायदेशीर होणार नाहीं. आतां सर्वच व्यापारी एकजूट करून माल न विकतील, तर ते सार्वजनिक नुकसान करितात, असें होतें; सबब त्याचा विचार करणें सरकारास जरूर आहे. सार्वजनिक हिताकडे सर्वांचें लक्ष्य असलें पाहिजे. हें हित जेव्हां व्यापारी लोक चढाओढीनें अति सवंग माल विकण्यास निष्प्रतिबंध असतात, तेव्हां साधतें.

**काम करण्याविषयीं गैर समजूतः—** मजूर लोकांची अशी कल्पना असते, कीं काम मंदीनें केलें म्हणजे, आपलें काम जास्त दिवस चालून रोजमुरे जास्त मिळतील. जर कोणत्याही कामास जास्त मजूर लागत असतील, तर मालकांकडून जास्त रोजमुरे आपणांस मिळतील. यावरून जर एखादें यंत्रामुळें, किंवा नवीन कल्पनेमुळें तें काम लवकर होईल, तर आपणास रिकामें रहावें लागेल, व मिळकत कमी होईल, अशाच समजुतीनें बरेच दिवस पर्यंत यंत्रानें ओझीं चढविण्याचें मजूर नाकारीत असत; आणि पूर्व पद्धतीनें शिड्या वगैरे लावून, तें काम जास्त दिवस चालावें, अशी इच्छा धरीत असत. शिवण्याचें यंत्र अमेरिकेंतून युरोपांत येण्यापूर्वी, लोकांस जे रोजमुरे मिळत, त्यापेक्षां तें यंत्र आल्यावर जास्त मिळूं लागले; परंतु त्यांस हें यंत्र सुरू होतांना अशी भीति वाटली कीं, हातानें जें काम होतें, त्याच्या वीसपट काम होऊं लागल्यानें, आपल्यास उपाशीं मरण्याचा प्रसंग येईल, कीं काय; परंतु त्यांच्या समजुतीच्या उलट परिणाम झाला. कारण वृद्धपणीं यंत्राचा उपयोग कसा करावा ही माहिती नसल्यामुळें, केवळ जुन्या रीतीनें हातानें काम करणारे मजूर यंत्र वापरणाऱ्यांस मदतनीस लागल्यामुळें, त्यांस रोजमुरे जास्त मिळूं लागले. व यंत्राचा उपयोग करणारांस त्यापेक्षां जास्त मिळूं लागले. असें कां झालें ह्या विषयीं विचार करूं. कोणताही माल सवंग होऊं लागला, म्हणजे त्याचा खप जास्त होतो. शिलाईचें काम सुलभ रीतीनें होऊं लागल्यामुळें त्या कामाची वृद्धि होत जाते; ज्यांना यंत्राचा उपयोग करितां येत नाहीं, त्यांस कापड बेतणें शिलाईचें काम पूर्ण करणें इत्यादि हातानें होणारीं कामें पूर्वीपेक्षां जास्त वाढतात. ती

मिळतात. यास्तव त्यांस जास्त रोजमुरे मिळतात.

**मक्त्यानें काम देणें व रोजीनें काम देणें:**– मक्त्यानें काम देणें हें फायदेशीर आहे. कारण रोजीनें काम दिलें असतां, लोक मागें सांगितल्या प्रमाणें काम करण्यांत कुचरपणा करितात. यामुळें कामास फारवेळ लागून, मालकाचें नुकसान होतें. आणि तेंच मक्त्यानें दिलें असतां थोड्या मुदतींत व्हावें या बुद्धीनें, ते लोक लवकर लवकर करितात. मात्र यांत मालकानें त्यांजवर नजर ठेवावी लागते; म्हणजे काम चांगलें होईल. अशा रीतीनें इतरांपेक्षां जास्त काम करून जास्त रोजमुरे मिळविणें अयोग्य आहे, अशी वरील श्रेणीची एक हरकत आहे. ते म्हणतात कीं अशा रीतीनें काम करूं लागल्यास, मनुष्य आपल्या जिवाकडे न पाहतां, पैशाच्या लोभानें काम पुष्कळ करील. परंतु ही त्यांची समजूत चुकीची आहे. कारण मनुष्य हा आपली प्रकृत पाहूनच काम करीत असतो.

**सारखेपणाविषयींची गैर समजूत:**– एकाच कारखान्यामध्यें व एकच काम करणाऱ्या एका मनुष्यापेक्षां दुसऱ्याला जास्त रोजमुरा मिळणें बरोबर नाहीं, असें मजूरांना वाटत असतें. अशी समजूत होण्याचें अंशत: कारण म्हटलें म्हणजे, जास्त काम करणारा मजूर कमी काम करणाऱ्या मजूरांचा धंदा काढून घेईल, अशी समजूत होते, किंवा दुसऱ्याची चांगली स्थिति पाहून यांस वाईट वाटतें, यामुळें असें होतें. आणखी त्यांचें म्हणणें असें आहे कीं, सर्व मनुष्यें सारखीं आहेत, व स्वतंत्र आहेत; परंतु हें त्यांचें म्हणणें किती चुकीचें हें दाखवितों. ज्यावेळीं मनुष्य जन्मास येतो, त्याच वेळीं तो स्वतंत्र नसतो. त्यास बरेच दिवस आईबाप त्याचें पालण पोषण करितात, यास्तव त्यांच्या हुकुमांत वागावें लागतें. पुढें जेव्हां तो वयांत येतो, किंवा वृद्ध होतो, तेव्हां तो स्वतंत्र होतो. तेव्हां हा स्वतंत्रपणाचा भाग जरी एकवेळ सर्वांचा सारखा आहे, असा मानिला, तरी सर्व माणसें सारखीं आहेत, हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण कोणाची बुद्धि चांगली असते; कोणाची शरीर प्रकृति चांगली असते, यामुळें इतरांहून अशा प्रकारचे लोक कांहीं नवीन शोध लावितात, अगर इतरांहून जास्त काम करितात. सबब त्यांस इतरांपेक्षां जास्त रोजमुरा योग्य आहे.

पहा, एक मनुष्य बुद्धीनें चांगला असून उद्योगी आहे. त्याणें ए-

काढें यंत्र असें तयार केलेंकीं; तेणेंकरून समाजाचें कल्याण होण्याचा बराच संभव आहे; आणि दुसरा आळशी व निरुपयोगी आहे. त्याणें सरासरी काम केलें आहे; आतां या दोघांस सारखाच रोजमुरा देणें रास्त होईल काय? होणार नाहीं हें उघड आहे. जरपहिल्यास रोजमुरा जास्त मिळाला नाहीं, तर अशीं यंत्रें वगैरे नवीं निघून समाजाचें सुख कधींही वाढणार नाहीं. **सबब सर्वांस सारखा रोजमुरा देणें रास्त नाहीं. यावरून सर्व मनुष्यें सारखीं आहेत हें म्हणणें चुकीचें ठरतें.**

---

## भाग ७

## रोजमुरे वाढविण्याविषयीं उपाय व राष्ट्रीय शिक्षण.

**रोजमुरे वाढविण्याविषयीं उपाय व्यर्थ होतात.** सुधारलेल्या व भरभराटीच्या देशांत मजूर लोकांची बहुतकरून वाईट स्थिति असते, हें पाहून परोपकारी व सदयलोक त्यांची स्थिति सुधारण्याविषयीं जे उपाय योजितात, त्यांपासून त्यांचें हित न होतां उलट परिणाम मात्र घडतात. याचें कारण पाहतां, उपाय योजणारे लोक अर्थशास्त्रानभिज्ञ असतात, यामुळें योजिलेल्या उपायांपासून अन्यथा कार्य घडतें. हें खालील उपपादनावरून वाचकांच्या ध्यानांत येईल.

प्रथमतः मजुरांची स्थिति सुधारण्यास ते रोजमुरे वाढविण्याचा उपाय मनांत आणितात. आतां हा कसा व्यर्थ आहे तो पहा. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें रोजमुरे वाढले, तर भांडवलवाल्यास नफा कमी होतो; कारण भांडवलाचा नफा + रोजमुरा = माल अशी त्याची रचना आहे. तेव्हां रोजमुरा जितका वाढला, तितका तो भांडवलाच्या नफ्यामध्यें कमी होणार. भांडवलवाल्याची इच्छा तें नेहमीं वाढतें राहावें, अशी असते. नफा कमी झाल्यानें त्याच्या वृद्धीस धोका आला म्हणजे मजूर

दार लोकांत वांटली जाणारी रकम कमी जहाली, असें म्हटलें असतां चिं-ता नाहीं. अर्थात् पुढें दराची वृद्धि कोठून होणार? तात्पर्य नफा कमी आला कीं, ते रोजमुरे पुढें कमी करीत जाणार. मिळून रोजमुरे वाढविले असतां, ते कांहीं टिकत नाहींत, असें सहजच सिद्ध झालें.

**जास्त रोजमुरे मिळण्याचा कायदा व त्याचे परिणामः-**
दुसरा एक उपाय ते असा मनांत आणितात, कीं सरकारनें मजूरदारांस अमुक इतक्या जास्त दरानें रोजमुरा द्यावा असा कायदा करावा; ही इच्छा वरीलप्रमाणें व्यर्थ असून, मोठी अनर्थकारी आहे. समजा कीं सरकारानें त्या त्या वेळीं चालू दराहून शेंकडा कांहीं २०।३० इतका दर वाढविला, तर काय होतें पहा. रोजमुरा वाढविल्यानें अर्थात् त्यास जिन्नस महाग विकावे लागणार. मग या मजूरदारांसुद्धां सर्वांना अधिक दरानें निर्वाहाचे पदार्थ घ्यावे लागणार; मग रोजमुरा वाढल्याचें श्रेय त्यांस कोठें आहे. तरी हा विचार एकदेशीय जाहला. इतर देशांचा संबंध या स्थितीशीं जो येतआहे, तो तर मोठा घातक आहे. रोजमुरे वाढल्यानें जिन्नस महाग झाले आहेत, असें बाह्यदेशीं समजल्यावर ते लोक माल तयार करून आणितात, व तो त्यांना आपल्या देशापेक्षां स्वस्त विकावयास सांपडतो; मग लोक स्वाभाविक च तो परक्या देशाचा माल घेतात. मग आपले भांडवलवाल्याची गती काय? तसेंच इकडे व्यापार बसल्यानें वाढत्या दरानें रोजमुरे सरकारच्या हुकुमानें ज्यांस द्यावयाचे, त्या मजूरदारांची स्थिति कशी होणार? व सरकारच्या हुकुमाचें सातत्य कितीसें राहणार, याची कल्पना स्वाभाविकच होणार आहे. म्हणजे एकंदरीत मजूरीविषयीं सरकारचा कायदा असणें व्यर्थ आहे. हें दुसऱ्या उपायाविषयीं जाहलें. याचप्रमाणें स्वापरोपकारी व सदय लोकांस मजूरांचे काबाडकष्टाकडे पाहून मोठी कळकळ उत्पन्न होते, व ते मजूरांनीं नेहमींहून अमुक कांहीं तरी २।३ तास कमी खपावें; व त्यांस मजुरी मात्र पूर्वींप्रमाणें मिळावी, असें इच्छितात; याचाही परिणाम वरील सरकारी कायद्यानें रोजमुरे वाढण्याची इच्छा करण्याप्रमाणेंच व्यर्थ होतो; हें स्पष्ट करावयास नकोच. इच्छेच्या दिशा तेवढ्या भिन्न आहेत. परंतु परिणाम अगदीं एक आहेत. हे उपाय विचारांतीं अहिताचे ठरले. आतां यास कोणता योग्य उपाय आहे तो पाहूं.

**राष्ट्रीयशिक्षण हाच उपाय त्यांची स्थिति सुधारण्यास कारण आहेः-** मजूरदार लोकांची स्थिति सुधारण्याला त्यांस नीति म्हणजे काय; सामाजिक वर्तन तें कोणतें, हें समजून कामाचें कौशल्य त्यांस साधलें पाहिजे. असें होण्यास राष्ट्रीय शिक्षण देणें हाच कायतो कल्याणप्रद उपाय आहे. कितीएक लोक असें म्हणतात कीं, ज्यांचे धंदे अगदीं नियमित आहेत, असे जे शेतकरी लोक त्यांस या शिक्षणाची जरूरी नाहीं; परंतु त्यांस देखील शिक्षणाची जरूरी आहे. शेतकीचीं हत्यारें जीं नव्यानव्या कल्पनांनीं वारंवार विशेष सोयीचीं होत असतात,तीं तीं वापरण्यास सुशिक्षित शेतकरी असल्यावांचून काय उपयोग? युनायटेडस्टेट व प्रशिया येथें फार दिवस हें शिक्षण सुरू असल्यामुळें, त्यांचे शेतकींत किंवा व्यापारांत इंग्लंडासारखें देशावर सुद्धां मोठें वर्चस्व होत आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. हें शेतकी करणाऱ्याविषयीं जसें सांगितलें, त्याचप्रमाणें सर्वप्रकारच्या धंद्याविषयी समजावयाचें आहे. इतर धंद्याविषयीं पहा. बर्मिंगहेम येथील लोक म्हणतात कीं, आमचे येथील कुलुपें प्रथमतः चोहोंकडे खपत असत; आतां अमेरिकन लोक अधिक सुशिक्षित जाहल्यामुळें, इंग्रज लोकांपेक्षां कमी दरानें ते त्यांना तीं विकण्यास समर्थ झाले आहेत. हें व्यापारांतील तोट्याविषयीं झालें.

**आतां दुसरा तोटाः-** आमच्या शेतकरी व मजूरदार लोकांनां शिक्षण नसल्यामुळें, त्यांनां कोणत्या वयांत कोणता धंदा करावयाचा,हें तारतम्य नसल्यामुळें, मोठ्या वयांत करावयाचीं कामें, ते आपले मुलांस लहान वयांतच करावयास लावतात. बुद्धि आणि शक्ति यांस न झेपण्यासारखें काम करावयास लागल्यानें, तीं अशक्त होऊन, त्यांनां वार्धक्य लवकर येतें; व या योगेंच ते लोक अशक्त व रोगी जाहले असतात; परंतु आपण असे काडी पैलवान कशानें बनलों, हें त्यांस कोठून समजणार? असा मिळून याप्रमाणें जनसमूह क्षीणवल होऊन सुखाला अंतरतो.

**तिसरा तोटाः-** या शिवाय शिक्षणाच्या अभावामुळें त्या लोकांकडून अपराध घडतात, हा तिसरा तोटा होय. अज्ञानानें सरळ वाट कोणास दाखविली आहे. तें त्यांस नाना व्यसनांत पाडितें, व दुःख परि-

णामी नाना छंद शिकवितें. या सर्व चाळ्यांस द्रव्य पाहिजे. मिळवत तर रो-जमुऱ्याची मिळेल तेवढीच म्हणजे केवळ पोटापुरतीच मात्र! व्यसनाचे षोक पुरविण्यास द्रव्यापेक्षा मास झाली. द्रव्य काय वाटेवरच पडलें आहे? श-हाण्याला कदाचित् बसल्या जागींही मिळेल; परंतु या मंडळीला तें चोरी कर कोणाला फसव, कोणाचा विश्वासघात कर; खोटी साक्ष दे, असल्या नीच कृत्यांवांचून कोठून मिळणार? झालें, असलीं कृत्यें केलीं कीं पुढें बिन भा-ड्याचें घर ठेवलेंच आहे. तेव्हां एक ज्ञान नसल्यानें केवढी घोर स्थिति मा-स होते पहा! हें अनुभव सिद्ध आहे कीं, कोणत्याही तुरुंगांत अ-शिक्षितांची संख्या फार असते. सारांश शिक्षण नसेल, तर मनुष्याचा नेहमीं तोटा होतो. त्यास अशक्तता येते. व सर्व तऱ्हेनें गैरसोय होऊन दुःख मास होतें. याकरितां मजूरदार लोकांची स्थिति जर सुधारावयास पा-हिजे आहे; तर त्यांस हें शिक्षण देणेंच भाग आहे.

**आतां हें शिक्षण कोणी व कसें द्यावें:—** हें शि-क्षण देण्याचें सरकारानें मनावर घेतलें पाहिजे; व त्या संबंधानें त्यांनीं कायदे केले पाहिजेत. राजा श्रयावांचून हें काम होणार नाहीं. रोग्यौ-षध संबंधाप्रमाणें परिणामी सुखकारक, परंतु आरंभीं या अडाणी लो-कांस व्यर्थ व त्रास दायक असें वाटणारें हें शिक्षण, ते लोक आपल्या-च मनानें कसे स्वीकारतील? तेव्हां शेतकरी, अथवा इतर कामाठी यांचीं मुलें असुक एक १२ अगर तेरा वर्षांचीं झालीं म्हणजे, त्यांनीं कांहीं वे-ळ दिवसांतून २ तास किंवा आठवड्यांतून कांहीं तास शाळेंत शिकल्या विना, त्यांस कोणीही कामावर घेऊंनये, असा सरकारानें कायदा करा-वा, म्हणजे आपोआपच तीं मुलें शिकूं लागतात, व त्यांची उत्तम रीतीनें सुधारणा होते. आतां शेतकरी लोकांनां आपल्या मुलांला हा वरील थो-डावेळही शिक्षणाकडे देतां येण्याचें अवघड पडेल, व त्यांस तितक्यावेळा-नें आपले कामाचें नुकसानसें वाटेल, परंतु विचार केला, तर त्यावेळीं त्यां-चें कांहींसें नुकसानें होतें; हेंही खरेंच; परंतु त्याच्या सुशिक्षित होणाऱ्या मुलांपासून शेतकीला पुढें जें उत्तरोत्तर उत्तेजन मिळत जाईल, त्यापुढें हा एवढा-सा तोटा कांहींच नाहीं, असें ठरेल. तात्पर्य मजूरदार लोकांची स्थिति सुधारण्यास राष्ट्री-य शिक्षण हाच एक उपाय आहे बाकीचे उपाय नसून अपाय होत.

# प्रकरण ३

## भाग १

## विनिमय, मोल, किंमत, भरती, खप व मालाची किंमत.

**विनिमयाची व्याख्या व त्यापासून फायदा—** कोणत्याही देशाची संपत्ति वाढण्यास विनिमय हा उत्तम मार्ग आहे. गरजेपेक्षां जास्त असलेला माल देऊन, त्याचे मोबदला ज्याची गरज आहे, तो माल घेणें त्यास विनिमय म्हणतात. अशा प्रकारें विनिमय झाल्यानें, एकाचा गरजेहून जास्त असल्यामुळें अनुपयोगी होणारा जो माल, तो दुसऱ्याच्या उपयोगी पडून, परस्पर उपयोगाची वृद्धि होते, हा विनिमयापासून मोठा फायदा आहे. विनिमयाचे नियम सांगण्यापूर्वी मालाचें मोल व किंमत यांजमधील भेद न समजल्यामुळें, जी भ्रांति उत्पन्न होते, ती दूर व्हावी म्हणून त्यांची व्याख्या आरंभीं करणें जरूरीचें आहे.

**मालाचें मोल—** एक पोतेंभर गहू देऊन त्याचे मोबदला दोन जोंधळ्याचीं पोतीं मिळतात, असें असलें, तर दोन जोंधळ्याचीं पोतीं हें एका गव्हाच्या पोत्याचें मोल आहे; यावरून असें समजतें कीं, मोल म्हणजे एका मालाची दुसऱ्याशीं तुलना होय. कारण एक पोतेंभर गहू देऊन, त्या मोबदला जोजो माल आपण घेतों, त्यात्या मालाच्या संबंधानें ह्या गव्हांच्या पोत्याचें मोल कांहीं विशेष असतें; ह्या गव्हांच्या मोबदला पांच पाऊंड चहा मिळाला, तर ह्या विशेष रीतीनें अंदाज केलेल्या एका गव्हांचे पोत्याचें मोल पांच पाऊंड चहा आहे असें होतें, यामुळें मोल हें सापेक्ष पद आहे. हें जास्त व्यक्त होण्यासाठीं आपण असें कल्पूं कीं, गव्हांचें मोल दुसऱ्या मालाच्या तुलनेनें उतरलें आहे, तर तितक्याच मानानें दुसऱ्या मालाचें मोल चढलें पाहिजे. उदाहरणार्थ गव्हांचें मोल निमे उतरल्यास, एक पोतेंभर गव्हांस पूर्वी इतका चहा न मिळतां, अडीच पाऊंड चहा मिळेल; यावेळीं चहाचें मोल दुप्पट वाढेल. कारण चहाच्या मोबदला पूर्वीच्या दुप्पट गहू मिळतील; म्हणून जेव्हां एका मालाचें मोल उतरतें, तेव्हां

त्याच्या मोबदला दुसरा माल कमी मिळतो. परंतु यावेळीं ज्या मालाचें मोल सामान्यतः उतरलें आहे, असें आपण मानितों, त्याच्या तुलनेनें इतर मालाचें मोल चढतें. यावरून सर्व मालाचें मोल चढलें आहे, किंवा उतरलें आहे असें वेळोवेळी लोक म्हणत असतात, तें चुकीचें आहे असें ठरतें. हें आणखीं उदाहरणानें स्पष्ट करितों. एक काम पांच असामी करितात; असें मानिलें, तर त्यांतून एकटा इसम चौघांइसमापेक्षां जास्त त्वरेनें काम करितो; असें घडणें अशक्य आहे. ह्या चार इसमांतून प्रत्येकापेक्षां तो जास्त त्वरेनें काम करील. परंतु चौघे एकत्र होऊन जें काम करितील, त्यापेक्षां जास्त त्वरेनें ह्या एकट्यास काम करितां येणार नाहीं. ह्याचप्रमाणें मोल हें सापेक्ष पद असल्यानें तें तुलनादर्शक आहे. सर्व मालांचें मोल सामान्यतें चढणें अशक्य आहे. कारण जर एखाद्या मालाचें मोल चढेल, तर ज्या इतर मालांशीं याची तुलना होईल, त्यांचें मोल उतरेल. हें समजण्यास अगदीं उघड आहे. तथापि मोल या पदाचें चांगलें स्पष्टीकरण व्हावें, म्हणून हें विवरण केलें आहे.

**नाण्याच्या अंदाजानें जें मोल तीच किंमत होय**- मोलाच्या एका विशेष स्थितीला किंमत म्हणतात. सुधारलेल्या देशांत धातूंचीं नाणीं चालतात. अशा देशांत ज्याअर्थी कोणत्याही मालाच्या मोलाचा अंदाज पैशाच्या तुलनेनें होत असतो; त्या अर्थी मोलाऐवजीं किंमत म्हणणें प्रशस्त होय. जरी सर्व मालाच्या मोलांत साधारणतः चढ किंवा उतार होत नाहीं, तरी साधारणतः किंमतींत चढ किंवा उतार होत असतो. कारण नाण्यांची संख्या जास्त जाहली, म्हणजे इतर मालाच्या संबंधानें त्यांचें मोल उतरतें; व मालाच्या मानानें नाण्याचें मोल कमी झाल्यास ज्या मालाची नाण्याशीं तुलना होते, त्याचें मोल चढतें; परंतु त्या मोलास किंमत म्हणतात; असें वर सांगितलें आहे. म्हणून मालाची किंमत चढते असें म्हणावें लागतें. ह्या उपपादनावरून मालाचें मोल व किंमत म्हणजे काय हें वाचकांस सहज समजेल. व किंमत हा शब्द मोलाइतका व्यापक नव्हे, हेंही सहज ध्यानांत येईल.

**मोलाचे ऐवजीं किंमतीचा कां विचार करावा?**- अर्थशास्त्रांत मालाच्या किंमतीविषयीं सिद्धांत केलेले नसून, मोलाविषयींचे मा-

व सिद्धांत ठरविले आहेत. परंतु व्यवहारांत त्यापासून फायदा नसून ते सिद्धांत समजण्याची मोठी अडचण मात्र होते. विद्याचारसंपन्न देशांत सर्व प्रकारचे व्यापार द्रव्याच्या साधनानें होत असतात. पैसा हेंच विनिमयाचें सर्वमान्यद्वार आहे असें लोक मानितात, तें अगदीं योग्य आहे. एका मालाच्या मोबदला दुसरा किती घ्यावा, याचा अंदाज नेहमीं पैशानें होत असतो, म्हणजे मालाच्या किंमतीचा विचार होतो, मोलाचा होत नाहीं. पहा एका शेतकऱ्याजवळ गहूं आहेत, ते देऊन कापड घ्यावें अशी इच्छा असल्यास, कापडाच्या संबंधानें गव्हाचें मोल ठरविणें भाग आहे. यासाठीं त्यास अदलाबदलीची मोठी त्रासदायक व खर्चाची खटपट करावी लागली असती, व किती गव्हास किती कापड घ्यावें, हें ठरविणें मोठ्या गैरसोईचें झालें असतें; परंतु उभय मालांची किंमत ठरल्यानें अदलाबदलीची खटपट व मालाचा अंदाज ठरविण्याची गैरसोय दूर होऊन मालाचा विनिमय होण्यास फार सुलभ पडतें.

**मालाची भरती—** गिऱ्हाइकांस मिळण्यासाठीं नेमिलेल्या ठिकाणीं व नेमिलेल्या काळीं, विक्रीकरितां ठेविलेला जो माल, त्यास भरती म्हणतात.

**मालाचा खप—** माल विकत घेण्याची इच्छा व तो घेण्याचें सामर्थ्य यास खप म्हणतात.

**भरती व खप यांचें समीकरण—** जर भरती व खप सम नसतील, तर चढउतारानें समीकरण होतें. खप जास्त असल्यास किंमत वढते; व समीकरण होतें; खप कमी असेल, तर किंमत उतरते. तसेंच भरती कमी असेल, तर किंमत चढते; व भरती वाढेल तर किंमत उतरते; असा किंमतीचा चढउतार, भरती व खप यांचे समीकरण होईपर्यंत चालू असतो. हें भरती व खप यांचें नियमन वाचकांच्या ध्यानांत राहण्यासाठीं खालील कोष्टक दिलें आहे.

| किंमत | भरती | खप |
|---|---|---|
| कमी | जास्त | कमी |
| जास्त | कमी | जास्त |

सर्व मालांच्या किंमती ठरविण्यासाठीं त्यांचे तीन वर्ग केले आहेत तेः—

( १ ) नियमित प्रमाणानें उत्पन्न होणाऱ्या वस्तु; जसें परलोकवासी कारागिरांचीं चित्रें

(२) अंगमोल किंवा उत्पादनखर्च वाढवून पाहिजे तितक्या उत्पन्नकरितां येणाऱ्या वस्तु; जसें खनिजपदार्थ व धान्यें वगैरे.

(३) अंगमोल न वाढवितां पाहिजे तितक्या उत्पन्न करितां येणाऱ्या वस्तु; जसें कापड वगैरे हस्तकौशल्यानें होणारे पदार्थ.

पहिल्या वर्गीतील मालाच्या किंमतीविषयीं विवेचन-

प्रसिद्ध चितारी टर्नर याच्या चित्राची किंमत कशावरून ठरते? या प्रश्नाचें उत्तर बहुतकरून त्या चित्राची भरती व त्याचा खप याच्या गुणोत्तरावरून निश्चित होते, असें येतें. परंतु भरती आणि खप यांचे गुणोत्तर म्हणणें चुकीचें आहे. व असें गुणोत्तर असणें शक्य नाहीं. कारण या उदाहरणामध्यें भरती म्हणजे कांहीं परिमित चित्रें, आणि खप म्हणजे तीं घेण्याची इच्छा. हीं दोन्हीं पदें विजातीय असल्यामुळें यांमध्यें गुणोत्तर स्थापित करणें अगदीं चुकीचें आहे. कारण ज्या पदार्थांची तुलना होते, ते सजातीय असावे लागतात. व अशा पदार्थांचेंच मात्र गुणोत्तर काढितां येतें. खप हें अनिश्चयात्मक पद आहे; कारण प्रत्येक मनुष्यास टर्नरचें चित्र आपल्या संग्रहीं असावें; अशी इच्छा मात्र असते; परंतु अशा सर्वांच्या इच्छेनें त्या चित्राच्या किंमतींत कांहीं फरक पडत नाहीं. तसेंच प्रत्येक गरीब मनुष्यास हिरा मिळावा अशी इच्छा असते; परंतु या इच्छेमुळें हिरे विकणाऱ्यास जास्त किंमत मिळेल असें मनांत आणण्याचें कांहीं कारण नाहीं; यावरून अर्थशास्त्रकारांनीं कार्यक्षम इच्छा असा एक शब्द ठरविला आहे. याचा अर्थ कोणताही पदार्थ घेण्याची इच्छा व तो घेण्याचें सामर्थ्य असा होतो. अशा इच्छेसच **कार्यक्षमखप** म्हणतात; व अशा खपानें मात्र मालाच्या किंमतीवर कांहीं कार्यें घडतात; हा खप पदार्थांच्या किंमतीप्रमाणें बदलत असतो; व तो किंमतीवर अवलंबून असतो. टर्नरच्या चित्रांची किंमत १०० रुपये झाल्यास जो खप होऊं लागेल, त्यापेक्षां त्यांची किंमत १० रुपये होईल, तर जास्त होईल. यावरून **कार्यक्षमखप** हा किंमतीवरून बदलत असतो. तथापि किंमतीची स्थिरावस्था कशी होते, या विषयीं एक उदाहरण घेऊन पाहूं. एक टर्नरचें चित्र विकावयाचें आहे, तें घेण्यास अ, ब, क असे तिघे गिऱ्हाईक आहेत, त्यांपै-

कीं प्रत्येकजण हजार रुपयांस तें घेण्यास उत्सुक आहे; या प्रसंगीं चित्रा-चा खप हा भरतीपेक्षां जास्त आहे, असें ठरतें. आतां (अ) आणि (ब) १५०० रुपयांस घेण्यास कबूल आहेत. परंतु (क) हा इतके देण्यास क-बूल नाहीं, तरी गिऱ्हाइकें दोन असल्यामुळें भरतीपेक्षां खप जास्त आहे; पुन्हा असें कल्पूं कीं (अ) हा दोन हजार रुपये देण्यास कबूल आहे; परं-तु (ब) हा १९०० रुपयांपेक्षां अधिक देण्यास कबूल नाहीं. तर खप आणि भरती यांचे समीकरण १९०० रुपये व २००० रुपये यांच्या दरम्यानच्या कोण-त्याही किंमतीनें होईल. जर (ब) १९०० रुपयांपेक्षां जास्त देण्यास कबूल न-सेल, तर (अ) हा १९०० पेक्षां कांहीं जास्त रकमेस तें चित्र मागूं लागेल; प-रंतु २००० हजारांपर्यंत किंमत चढल्यासही (अ) घेण्यास कबूल होईल, अ-सें जर त्या चित्र विकणाऱ्यास समजेल, तर आज तें चित्र मी विकण्यास कबू-ल नाहीं, असा बाहणा करून तो व्यापारी (अ) पासून २००० रुपये घेऊन, तें चि-त्र त्यास विकील. यावरून या वर्गांतील मालाची किंमत **भरती आणि ख-प याच्या गुणोत्तरानें होत नसून, त्यांच्या समतेनें ठरते. यास्तव भ-रती आणि खप यांचें गुणोत्तर न म्हणतां, भरती आणि खप यां-चें समीकरण म्हणणें हें प्रशस्त होय.**

ज्या चित्रास (क) व (ब) अनुक्रमें १००० व १५०० रुपये देण्यास क-बूल आहेत, त्याच चित्रास (अ) हा २००० रुपये किंमत देऊन तें विकत घे-तो; तेव्हां (अ) हा इतकी जास्त किंमत कां देतो? याचें स्पष्टीकरण करितों. मालाच्या मोलाचीं मुख्य तत्वें दोन आहेत.

**१ व्यक्तिमात्रास पदार्थाचा होणारा उपयोग.**

**२ तो संपादन करण्यास असणारी अडचण.**

हीं दोन कारणें मोलाचे घटकावयव किंवा तत्वें आहेत. व बीज पद्ध-तीनें तीं तत्वें संक्षेपानें दाखविण्यास उपयोग आणि अडचण यांतील (उ) आणि (अ) अशीं आद्य अक्षरें घेऊं. ज्या पदार्थास विनिमयार्हत्व असतें त्यांत (उ) आणि (अ) या दोन्ही तत्वांचा समावेश झालेला असतो. पहा, म-नुष्यास हवेपेक्षां दुसरा कोणता पदार्थ आवश्यक नाहीं; तथापि तीस को-णी किंमत दिली आहे काय? नाहीं याचें कारण तींत (अ) ह्या दुसऱ्या मू-लतत्वाचा अभाव आहे. कारण ईशकृपेनें सर्व ठिकाणीं ती आम्हांस अ-

नायासानें पाहिजे तितकी मिळतें.

दुसऱ्यापक्षीं ज्यामध्यें ( उ ) या मूलतत्वाचा अभाव असेल, तो पदार्थ संपादन करण्यास कितीही श्रम लागले, तथापि त्यास कोणी किंमत देत नाहीं. तो संपादन करण्यांत आपली कांहीं इच्छा तृप्त झाली पाहिजे, किंवा त्यापासून आपली गरज भागली पाहिजे. हिरा हा अलंकाराचे उपयोगीं पडतो; व हिऱ्याचे अलंकार आपणांस मिळाल्यास आपली इच्छा तृप्त होते. म्हणून तो उपयोगी आहे; व तो मिळण्यास अडचणी आहेत. यावरून लोक त्यास मूल्यवान म्हणतात. परंतु रुचिवैचित्र्यामुळें जर त्याचा उपयोग दागिन्याचे कामीं होणार नाहीं, तर संपादनाच्या केवळ अडचणीमुळें त्यास किंमत येणार नाहीं; म्हणून **उ आणि अ या दोन तत्वांची एकसमयावच्छेदेंकरून विद्यमानता असल्यावांचून, पदार्थास किंमत येणार नाहीं.** कारण ज्या पदार्थापासून आपली कोणतीही गरज भागत नाहीं, किंवा आपली इच्छा तृप्त होत नाहीं, अशा पदार्थास कितीही संपादन श्रम पडले, तरी किंमत कोण देईल? दुसऱ्यापक्षीं पदार्थ कितीही आवश्यक असला, तथापि तो संपादन करण्यास कोणतीच अडचण नसेल, तर त्यास किंमत कशी मिळेल? हें आणखि विशद होण्यासाठीं मोत्याचें उदाहरण देतों.

**मोत्यें मूल्यवान कां असतातः—** मोत्यांस किंमत जास्त येते म्हणून समुद्रांत बुडून लोक तीं काढितात? किंवा लोक समुद्रांत बुडून मोत्यें काढितात, म्हणून त्यांस किंमत येते? या दोन प्रश्नांचा आरंभीं विचार करूं. समुद्रांत बुडून त्यांतून मोत्यें बाहेर काढणें, ही मोठी धोक्याची गोष्ट आहे. व इतके श्रम करून जीं मोत्यें मिळतात, तीं त्यांच्या श्रमाचे मानानें पाहतां, थोडींच मिळतात; म्हणून जर त्या मोत्यांस जास्त किंमत आली नाहीं; तर त्यांस योग्य रोजमुरा मिळाला असें होणार नाहीं. आतां त्यावरून ते लोक श्रम करितात, व आपला जीव धोक्यांत घालितात, म्हणूनच मोत्यांस किंमत अधिक येते, असें मात्र समजूं नये. जर असें असतें, तर ज्यामध्यें मोत्यें असतात, अशा शिंपांसुद्धां त्याप्रमाणें किंमत येणें वाजवी होतें; परंतु त्यांस कोणीही तितकी किंमत देत नाहीं, तसेंच एखाद्या पाणबुड्यानें पुष्कळ वेळ बुडून, तळचा एक दगड बाहेर काढिला, व ज-

री तो काढण्यास त्यास मोत्यांप्रमाणें श्रम पडले आहेत, तरी त्या दगडास मोत्यांप्रमाणें किंमत मिळेल काय? मिळणार नाहीं. कारण त्या दगडाचा उपयोग कांहीं नसतो. मोत्यांचा उपयोग दागिने करण्याकडे होतो, व हे दागिने आपल्यास मिळावे, अशी बायकांस उत्कट इच्छा असते, परंतु मोतीं समुद्रांतून बाहेर काढण्याचें काम फारच धोक्याचें असल्यामुळें; तीं पाहिजे तितकीं मिळणें शक्य नसतें. म्हणून त्यांस किंमत जास्त येते. या उदाहरणावरून **मोत्यांचे आंगीं वरील दोन्ही तत्वांचा समावेश झाला असल्यानें तीं मूल्यवान् होतात,** हें उघड आहे.

वरील चित्राच्या व मोत्यांच्या उदाहरणावरून या दोन तत्वांचें एकीकरण होऊन मालास किंमत येते, हें वाचकांस समजलें असेल. (क) आणि (ब) यांच्या समजुतीनें त्या चित्राचें उपयोगरूप मोल अनुक्रमें १००० आणि १९०० रुपये आहे, व (अ) च्या समजुतीनें त्याचें मोल २००० रुपये आहे. १९०० रुपयांपेक्षां त्याचें मोल उतरेल, तर भरतीपेक्षां खप वाढेल, आणि २००० रुपयांपेक्षां जास्त वाढल्यास त्याचा खप होणार नाहीं. एकंदरींत या वर्गीतील मालाच्या किमतीचा निर्णय खालील कारणावरून होतो.

**१ खप हा किंमतीवर अवलंबून असतो.**

**२ किंमत ही भरती आणि खप यांची अगदीं बरोबर रीतीनें समता होईल, अशी असावी लागते.**

(अ) नें इतक्या जास्त किंमतीस तें चित्र कां घेतलें, यांत त्याचे अनेक हेतु असतील; त्यांचें स्पष्टीकरण करितां येणार नाहीं. तथापि कांहीं सांगतों (ब)पेक्षां तो श्रीमान असल्यानें, पैशाचें महत्व जसें (ब) स वाटतें, तसें त्यास वाटत नसेल. चित्रकलेंत (ब)पेक्षां हा जास्त पारंगत असल्यानें त्यानें जास्त किंमत दिली असेल; किंवा त्यापासून पुढें आपला जास्त फायदा होईल, अशा अनेक हेतूंनीं त्याणें तें विकत घेतलें असेल. एकंदरींत **व्यक्तिमात्राचे हेतु निरनिराळे असतात. त्या त्या हेतूंप्रमाणें पदार्थाचें उपयोगरूप मोल कमजास्त रीतीनें ठरतें.**

**आतां दुसऱ्या वर्गीतील मालाच्या किंमती विषयी विचार**— या वर्गामध्यें शेतकीचे सर्व जिन्नस व खनिजपदार्थ यांचा समावेश होतो. शेतकीमध्यें उत्पन्न होणाऱ्या मालाची किंमत निदान तीन घातलेल्या

भांडवलाचा साधारण नफा व केलेल्या श्रमाचा रोजमुरा मिळण्यापुरती असेल, तर शेतकरी तो धंदा करील, अन्यथा करणार नाहीं. जर शेताचा सारा चढला, परंतु लागवडीचा खर्च कमी झाला नाहीं, तर त्याचें नुकसान भरून येण्यासाठीं धान्याचे दर चढले पाहिजेत. व लोकसंख्येच्या वृद्धीमुळें धान्याची जास्त भरती होण्यासाठीं अगदीं निकस जमिनी लागवडींत येतात, यामुळें सर्व जमिनीचे सारे चढतात. परंतु जर सारे चढतील, तर धान्याचा भावही चढला पाहिजे. जी अगदीं निकस जमीन लागवडींत आलेली असते, ती लागवडीची मर्यादा होते, व तीस सारा नांवचा मात्र असतो. अशा जमिनीची लागवड होण्याचें कारण, तींत घातलेलें भांडवल व श्रम याबद्दल साधारण नफा होत असतो, म्हणून होते, तसें नसल्यास तिची लागवड होणार नाहीं, असें पूर्वी रिकार्डोच्या साऱ्यासंबंधीं उपपत्तीवरून सिद्ध झालें आहे. तसेंच साऱ्यामुळें धान्यादिकांची किंमत चढत नसून, त्यांचा खप जास्त वाढल्यामुळें सर्व प्रकारच्या लागवडीस योग्य अशा जमिनीची लागवड होते, त्यांत अगदीं निकृष्ट जमीन असेल, तींत धान्य उत्पन्न करण्यासाठीं जास्त खर्च करावा लागतो. यावरून धान्याची किंमत चढते; हें उदाहरणावरून स्पष्ट करितों.

पहा कीं, एका बेटांत एक शेत आहे त्यांत शंभर खंडी धान्य दरसाल उत्पन्न होतें, तें २० रुपये खंडीप्रमाणें विकून, त्याचा खर्च भागतो. पुढें तेथें वस्ती जास्त झाली, तेव्हां दीडशें खंडी धान्य उत्पन्न करावें लागलें, व तें अधिक खर्च केल्याशिवाय होईना; तो खर्च होत असतां धान्याचें मोल चढून दरखंडीस तीस रुपये देणें भाग झालें. कारण सुपीक जमिनींत एक खंडी भात पिकवावयास वीस रुपये लागत होते; तितकेंच भात कमपीक जमिनीवर जास्त खर्च केल्यामुळें तीस रुपयानें होऊं लागलें; आणि सर्व भाताचा दर तीस रुपये प्रमाणें झाला; व सुपीक जमिनीवर दरखंडीस दहा रुपये नफा मिळूं लागला. याजवरून ह्या वर्गीतील जिनसांचे मोल निकृष्टरीतीनें उत्पन्न करावयास जो खर्च लागेल, त्या मानानें ठरतें, हें उघड आहे. लोकसंख्येच्या वृद्धीमुळें धान्य जास्त लागतें व त्याची किंमत चढते. या स्थितीचा प्रतिकार खालील दोन कारणांतून कोणत्याही एका कारणानें होतो.

**१ शेतकीमध्यें सुधारणा होऊन पूर्वीपेक्षां जास्त धान्य उत्पन्न होऊं लागल्यास किंमती चढण्याचा प्रतिकार होतो. किंवा,**

अवश्य लागणाऱ्या. धान्याची भरती परदेशांतून झाल्यास होतो.

**तिसऱ्या वर्गीतील मालाच्या किंमतीविषयीं विवेचन-** या वर्गीतील मालांचा खप वाढतो, तेव्हां त्याचें उत्पादन यंत्रानें किंवा अन्यसाधनानें पूर्वीपेक्षां सुकर होऊन, माल विपुल उत्पन्न होतो; यामुळें, त्याची किंमत उतरते. यावरून यावर्गीतील मालाच्या व्यापारांत जो साधारण नफा होतो, तेणेंकरून त्याच्या उत्पादनाचा खर्च भागतो. या वर्गीतील मालाची भरती व खप यांत एकाएकीं फेरफार होईल, तर त्याची किंमत उत्पादनास लागणाऱ्या खर्चापेक्षां जास्त मिळते. परंतु ही स्थिति भांडवलाच्या चढाओढीमुळें कायम रहात नाहीं. तरती किंमत पुन्हा पूर्वस्थितीस येते. म्हणजे उत्पादनास लागणारा खर्च भागण्यापुरता मात्र नफा मिळतो. भरती व खप यांमध्यें अकल्पित फेरफार झाल्यामुळें किंमती चढतात यामसंगीं, व उत्पादनास लागणाऱ्या खर्चाच्या मानानें किंमतीची स्थिरता असते अशा प्रसंगीं, भरती आणि खप यांचें निरंतर समीकरण किंवा समता होण्याचा कल असतो.

**भरती आणि खप यांच्या तिन्ही वर्गीतील मालाच्या किंमतीवर घडणाऱ्या कार्यांचा उपसंहार-**

१ पहिल्या वर्गीतील मालाची भरती आणि त्याचा खप यांचे समीकरण होण्यास त्या मालाची किंमत चढते. व असें झाल्यानें भरतीपेक्षां खप जास्त असल्यास तो नाहींसा होतो.

२ दुसऱ्या वर्गीतील मालाची भरती अंगमोल वाढविल्यावांचून जास्त होत नाहीं. यांत अवश्य लागणाऱ्या शेतकी संबंधीं धान्यादि मालाचा समावेश होतो. या मालाचा खप भरतीपेक्षां जास्त असल्यास भरती वाढविणें भाग पडतें; परंतु उत्पादन खर्च वाढल्यावांचून, हें होणें शक्य नसतें. म्हणून वाढलेला खर्च भागण्यासाठीं किंमत चढलीपाहिजे.

३ या वर्गीतील मालाची भरती अंगमोल न वाढवितां, पाहिजेतितकी जास्त करितां येते. या मालाचा खप भरतीपेक्षां जास्त असल्यास किंमती चढतात, व खप कांहीं अंशीं कमी होतो; परंतु अशा प्रकारची ख-

पाची भरतीशीं कांहींवेळ पर्यंत मात्र समता असते. किंमती चढल्यानें जास्त नफा होऊं लागतो. यामुळें जास्त भरती करण्यास उत्तेजन मिळतें. मालाचें उत्पादन जास्त होऊन, भरती विपुल होते; म्हणून किंमती उतरतात. शेवटीं भरती वाढून खपाची भरतीशीं समता होते.

**या प्रमाणें तिन्ही वर्गांतील मालांच्या किमतीचें नियमन ज्या कारणांनीं होतें, त्यांचा संक्षेपेंकरून हा उपसंहार केला आहे.**

वर लिहिल्याप्रमाणें जिनसाच्या मोलाविषयीं जरी खरें आहे, तथापि एकाच बाजारांत दोनतीन भाव असल्याचें दृष्टीस पडतात ह्याचें कारण एकादा जिन्नस खरेदी करण्यास जी चौकशी व हुशारी पाहिजे, तशी सर्वत्र नसते. तशांत श्रीमान् लोकांचा व्यवहार असा कांहीं असतो कीं, गेलें किती, व आलें किती ह्याची त्यांना पर्वा देखील नसते; म्हणून वगैरे कारणामुळें वर लिहिल्याप्रमाणें दर दिसतात, परंतु हेंही व्यापारी लोकांच्या हुशारी किंवा गैरहुशारीमुळें किरकोळ व्यापारांत होतें; एक धोक व्यापारांत वर लिहिल्या नियमानेंच व्यवहार होतो.

---

# भाग २
# पैसा.

—o—

**अदलाबदलीनें व्यवहार करणें सोईचें होत नाहीं:-** मोलाच्या एका विशेष स्थितीस किंमत म्हणतात असें मागें सांगितलें आहे. प्रत्येक देशाची रानवट स्थिति जाऊन तो जेव्हां सुधारणेच्या प्रथम पायरीस येऊन पोंचतो, तेव्हां विनिमयास साधनीभूत असा कांहींपदार्थ सर्वांच्या संमतीनें ठरविण्याची मोठी आवश्यकता उद्भवते; कारण असें साधन नसल्यास, सर्व व्यवहार अदलाबदलीनेंच व्हावे लागतील. परंतु अदलाबदलीनें व्यवहार चालणें हें किती गैरसोईचें आहे, हें उदाहरणानें दाखवितों. पहा एक शेतकरी आहे त्याजपाशीं धान्य पुष्कळ आ-

हे पण त्याला पांघरायाला पासोडी नाहीं, ती त्याला कशी मिळावी? ती मि-ळण्यासाठीं त्याला साळ्याकडे गेलें पाहिजे; आणि पासोडीच्या मोला इतकें धा-न्य देऊन, त्याजकडून ती घेतली पाहिजे.

बरें कदाचित् त्या साळ्याजवळ धान्य असल्यामुळें धान्याची त्याला ग-रज नाहीं, तर ज्या जिनसाची त्याला गरज असेल, तो जिन्नस ज्यापाशीं अ-सेल, त्याजवळ गेलें पाहिजे. आणि त्याला धान्य देऊन तो जिन्नस साळ्याला आ-णून दिला पाहिजे; मग त्याला पासोडी मिळणार. कदाचित् दुसऱ्यालाही धा-न्याची गरज नसली, आणि दुसऱ्या एखाद्या जिनसाची गरज असली, तर तो जिन्नस ज्यापाशीं असेल, त्याकडे गेलें पाहिजे, आणि त्याला धान्य देऊन तो जिन्नस त्याकडून आणून त्याला दिला पाहिजे. त्याप्रमाणें अदलाबदलीच्या कामास खटपट किती बरें पडेल? फारच पडेल यांत संशय नाहीं. एखादे वेळेस एक दोन घरें फिरला, म्हणजे त्याचें काम होईल; आणि एखाद्या वेळेस शंभ-र घरें फिरला, तरी काम होणार नाहीं. अशा अडथळ्यामुळें व्यापाराची वृ-द्धि न होतां, तो निरंतर प्राथमिक स्थितीतच राहील. **अशा अडचणीमुळें सुधारलेल्या देशांत विनिमय अबाधितपणें चालण्यासाठीं, स-र्वानुमतानें, या तिन्हाईत अशा पैशाची व्यवहारांत प्रवृत्ति पड-लेली आहे.**

**पैशापासून होणारी सोयः–** ही सर्व अदलाबदलीची खटपट पै-शाच्या मदतीनें नाहींशी होते. कारण ज्या जिनसाचा पैसा केलेला असतो, तो जिन्नस घेऊन, आपला माल मोबदला देण्यास लोक फार खुष असतात.

**कोठें कोठें पैक्यानें जें काम करून घ्यावयाचें तें कांहीं दु-सऱ्या वस्तूनीं करून घेतातः–** कांहीं देशांत वस्तूनीं व्यवहार करावा अ-सें सर्व लोकांच्या संकेतानें ठरलेलें असतें. जेथें व्यापारव्यवहार फार थोडका चालला असतो, व जेथें मजुरी म्हटली असतां फार स्वस्त, अशा मुलखांत पै-क्याचे ठिकाणीं मीठ, तंबाकु, कवड्या इत्यादि जिन्नस वापरीत असतात, प-रंतु हे जिन्नस थोड्या काळांत नाश पावतात; यामुळें पैशा ऐवजीं त्यांचा उपयोग करणें सोईचें नाहीं.

**धातूंच्या नाण्यांनीं व्यवहार करण्यास जशी सोय पड-ते तशी इतर पदार्थांनें पडत नाहींः–** सामान्यतः ज्याचा पैसा क-

रावयाचा, तो पदार्थ असा असला पाहिजे कीं, त्यास स्वतः आंगची कांहीं किंमत असली पाहिजे; व त्याचें आकारमान ल्हान असून त्यामध्यें जास्त मोलाचा समावेश झाला पाहिजे. तसेंच त्याचें मोल नेहमीं कायम असलें पाहिजे. अशा प्रकारचे त्या पदार्थामध्यें गुण असावे लागतात. व असा पदार्थ एक धातूच आहे. म्हणून धातूचींच नाणीं करितात. पहा धातु कधींही नासत नाहींत. व त्या घनवर्धनीय असल्यानें, त्यांस पाहिजे तेवढा आकार देतां येतो. व त्याचा समावेश खनिजपदार्थांत असल्यामुळें त्या परिमित असतात. यामुळें स्वतः त्यांस कांहीं अंगमोल असतें; ह्यामुळें धातूंची योजना पैक्याकडे होते.

**धातू व्यवहारामध्यें पुरातनकाळापासून पैशाचे ठिकाणीं योजितात:-** ग्रीक लोकांचे इतिहासांत, व रोमन लोकांचे इतिहासांत, अनुक्रमें लोखंडाचे व तांब्याचे पैशाविषयीं लिहिलेलें आढळतें. त्याच प्रमाणें सोन्या रुप्याचें नाणें या देशीं प्राचीनकालापासून चालत आलें असावें. कारण या देशांतील प्राचीनग्रंथांत सुवर्णादि धातूंचीं नांवें सांपडतात. मनुस्मृतींत लिहिलें आहे कीं, ज्या कुळांत अमुक कर्में होत नसतील, तें कुळ जरी गाई, बकरीं, सोनें, धान्य यांहीं करून संपन्न असलें, तथापि त्या कुळांतली नवरी द्विजानें करूनये. कोणी असें सांगतात कीं, अमेरिकाखंडांत सोन्याच्या खाणी सांपडण्याच्या पूर्वीं, सोन्याची फार कमती होती. इ॰ स॰ चालू झाल्याचे पूर्वीं २०० वर्षांवर रोम शहरांत सोन्याचें नाणें प्रथम पाडिलें; त्याच्या पूर्वीं सुमारें ६०. वर्षें रुप्याचें नाणें पाडिलें होतें.

**नाणीं करूनच कां वापरावीं?** — फारच प्राचीनकाळीं नाण्याचे ऐवजीं धातूच्या लगडीच वापरीत असत. ख्रिस्तमताचे पुस्तकांत असें लिहिलें आहे कीं, आब्राहीम ह्यानें रुप्याचे ४०० तुकडे देऊन, एक शेत घेतलें; व तें रुपें वजन करून दिलें असें लिहिलें आहे. परंतु धातूच्या नाण्याच्या ऐवजीं लगडी वापरल्यानें, व्यवहार करण्यास फार अडचण पडत असे, कारण ज्या धातूनें व्यवहार करावयाचे, ती तोलली पाहिजे, व ती कसास लावून, तिचा दर ठरविला पाहिजे. परंतु नाण्याची चाल झाल्यानें ही सर्व खटपट व त्रास चुकतो. कारण टांकसाळींत नाणें पाडणें म्हटलें म्हणजे, हा धातूचा अंश अमुक वजनाचा व अमुक चोखपणाचा आहे,

असें समजण्यासाठीं त्या धातूवर मुद्रा अथवा छाप मारिला असतो. व ह्याप्रमाणें धातूस संस्कार झाला म्हणजे, तेंच नाणें पैका असें समजतात.

**पूर्वी पैशाबद्दल गुरें वापरीत:-** नाण्याची चाल पडण्याचे पूर्वी, लोकांस आपल्या मालाची किंमत ठरविण्यास मोठी अडचण पडे. म्हणून सर्वानुमतें नित्यवहिवाटीचे पदार्थाची किंमत ठरवून, त्याच्या किंमती इतकी जो पदार्थ घ्यावयाचा अगर द्यावयाचा असेल, त्याची किंमत समजून, व्यवहार करीत. पूर्वी अमक्याची संपत्ति अमुक गुरां इतकी बोलत. तो हजाराची किंवा लाखाची असामी असें बोलत नसत. कोणाएकाकडे जे पशू असतील, तीच कायती त्याची संपत्ति असें समजत. मनुस्मृतीत आठप्रकारचे विवाह सांगितले आहेत. त्यांत नवरीचा बाप वरापासून २ किंवा ४ गाई घेऊन, ती नवरी त्यास देतो, तो आर्षविवाह. याजवरून असें सिद्ध होतें कीं, आतां जे कोणी व्यवहार रुपये देऊन करितात, तो पूर्वी पश्वादिक घेऊन करीत होते. अद्याप तरी कोठें कोठें असें आहे कीं, अमुक वस्त्याची किंमत अमुक घोड्यां इतकी. परंतु सुधारलेल्या देशांत अमक्याचें भांडवल म्हणजे अमुक द्रव्यसंख्या असें म्हणतात.

**सोन्याची किंमत कशी ठरते?-** सोन्याचे लगडीची मूळ किंमत सोनें उत्पन्न करावयास जो खर्च बसला असतो, त्या मानानें असते; व त्या प्रमाणेंच दुसऱ्या जिनसांचीही किंमत त्यांच्या खर्चाप्रमाणेच असते. सोनें खाणींतून काढण्यास जे श्रम पडतात, व तें जेथें विकलें जाईल, त्या ठिकाणीं न्यावयास जी मेहनत लागते, तो सर्व उद्योग करणें ह्याचेंच नांव सोनें उत्पन्न करणें होय. व सोन्याचें मोबदला मोल तर त्याची ज्याप्रमाणें भरती व खप असेल, त्यावर अवलंबून असते. म्हणून सोन्याच्या मोबदला जो माल द्यावयाचा, त्यापेक्षां अधिक अथवा कमी माल द्यावा लागला, म्हणजे समजावें कीं, सोन्याचे मोबदला मोलांत अंतर पडलें आहे.

**सोनें कमी झाल्याचा परिणाम:-** सोन्याची व रुप्याची कमतरता झाल्यामुळें असें होईल, कीं जितक्या मालाचे मोबदला पूर्वी जें

सोनें मिळत असे, तितक्या मालाचे मोबदला सोनें रुपें कमी मिळूं लागे-ल, म्हणजे फराभर धान्यास जो पैसा येत होता, त्यापेक्षां कमी पैका येऊं लागेल, अर्थात् धान्य स्वस्त होईल. एकटें धान्य काय परंतु असें झाल्यानें वस्त्रपात्र इत्यादि सर्व जिन्नस स्वस्त होतील. परंतु अशा रीतीनें जो माल उ-तरला, तो वास्तविकरीत्या स्वस्त झाला असें नाहीं; म्हणजे जिन्नस पुष्कळ झा-ला असतां, स्वस्त होणें व पैक्याचे कमताईमुळें स्वस्त होणें, त्या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. व त्या दुसऱ्या प्रकारानें धान्य स्वस्त झालें असतां, त्यांत देशाचें हित झालें असें होणार नाहीं. पहा ४ आण्यानीं पायली ज्या-वेळीं धान्य मिळत होतें, त्या वेळच्या धान्या इतकेंच धान्य गांवांत अस-तां, तें जर २ आण्यांनीं पायली मिळूं लागेल, तर त्यामुळें धान्य वाढ-लें असें होणार नाहीं. म्हणून अशा रीतीनें स्वस्त झालेला माल फक्त दि-सण्यांत स्वस्त झाला, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

**सोन्याच्या भरतीचा परिणामः—** तसेंच सोन्यारुप्याची एखा-दी नवीन खाण सांपडली, यामुळें अथवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें पैशा-ची भरभर झाली, तर सर्व जिनसांचा भाव वाढेल, हें उघड आहे. परंतु असा जो भाव चढतो, तो जिनसांच्या कमताईमुळें चढत नाहीं. म्हणून जरी त्या-ची किंमत चढली, तरी अंगमोल चढत नाहीं; म्हणजे त्या जिनसाच्या उत्पादनांत अधिक उणें होत नाहीं. म्हणून लोकांस मिळावयाचा तितकाच मिळत अ-सतो. इतकें मात्र होतें कीं; द्रव्य पुष्कळ झाल्यामुळें पैक्याचा भाव उतर-तो, यामुळें असें होतें, कीं पूर्वी जो जितक्या पैशानें मिळत होता, तितक्या-च पैशानें तो मिळत नाहीं; त्यास अधिक पैसा द्यावा लागतो. धान्याचे द-रपायलीस दोन आण्यांच्या ठिकाणीं चार आणे द्यावे लागतात. परंतु पै-क्याची भरभर झाल्यानें रोजमुरा दुप्पट मिळूं लागतो, त्यामुळें ४ आणे देऊनही धान्य घेण्याचें सामर्थ्य मजूरांच्या अंगीं येतें.

**पैशाचे भावांत अंतर पडल्यानें होणारें नफानुकसान—** याप्रमाणें पैक्याचे भावांत एकाएकीं अंतर पडलें असतां, तें सर्व लोकां-स जाचतें; आणि कित्येकांचा असा मोड होतो कीं, ते कधींच सुधारत नाहींत. पहा पैक्याचा भाव दुप्पट चढला, तर भाडयाचे एवजानें जो जिन्न-स मिळावयाचा त्याच्या दुप्पट मिळूं लागेल; म्हणजे १०० रुपयांनीं २००

रुपयांचा जिन्नस मिळेल. ह्यावरून पाहतां भाडें तरी दिसण्यांत जसेंच्या तसेंच असतां, वस्तुतः दुप्पट वाढेल, व तें निरर्थक कुळाकडून काढून धन्याची भर करावयास दिलें जाईल. तसेंच पैक्याची भरभर होऊन, त्याचा भाव उतरला असतां, त्याच्या विरुद्ध परिणाम होईल; म्हणजे कुळाचें हित होईल; व धन्याचें नुकसान होईल. कारण पैक्याचे कमतरतेसमयीं जें भाडें उत्पन्न होत होतें, तितकें आतां होणार नाहीं. ह्याप्रमाणें पैशाच्या भावांत अंतर पडलें असतां, हें वर सांगितलेलें नफा नुकसान होतें. त्याच प्रमाणें पैक्याचा भाव उतरला असतां, व्याजबट्टा करणाऱ्याचेंही नुकसान होतें.

**पैशाबद्दल विरुद्ध ग्रह व त्याचें समाधानः—** ह्यावरून कोणी म्हणेल कीं, “पैसा पुष्कळ झाला म्हणजे सर्व जिन्नस महाग करितो, व कमी झाला म्हणजे स्वस्त करितो, एकूण महागाई व सवंगाई करणें एवढाच कायतो पैशाचा पराक्रम. ह्याच्यानें देश कांहीं सधन करवत नाहीं, म्हणून ह्यास संपत्ति मानूनये. हा केवळ संपत्तीचें सोंग आहे;” परंतु असें मानणें योग्य नाहीं. कारण ज्या मोलानें व्यवहारांत संपत्ति वागतें; त्याच मोलानें हा वागतो. याचे ठायीं कांहीं मोल नसतें, तर ह्यास कोणी संपत्तिरूप पदार्थ बदल दिला नसता. पैसा हा संपत्तीचाच अंश आहे. जे पदार्थ उपयोगी व उपभोग्य तेच परिमित मानानें मिळाले असतां, त्यांस संपत्तीचें स्वरूप येतें; व पैका तर मोबदल्याचें व व्यवहाराचें मोठें साधन व मोलाचे निर्णयाविषयीं प्रमाण झाला आहे, त्या अर्थी पैशाचा उपयोग काय सांगावा? ह्यानें मोबदला करण्याचा व्यवहार सोपा केला आहे; त्या योगानें विकाऊ जिनसांचा चहूंकडे फैलाव होऊन, ते पुष्कळ उत्पन्न करावे, अशी लोकांस मोठी हौस येऊं लागली.

**व्यापार निष्प्रतिबंध असल्यानें होणारे नफेः—** वर लिहिल्या प्रमाणें पैशाच्या भावांत अंतर पडूं लागलें असतां, ज्या देशीं व्यापार निष्प्रतिबंध चालतो, म्हणजे बाहेर नाणें व धान्य नेण्यास मोकळीक असते, त्या देशाचे व्यापारास कांहीं आडकाठी येत नाहीं. पहा इंग्लंददेशीं नाणें व्यापारास बाहेर पाठविण्याची मनाई नाहीं. तेणेंकरून व्यापारास चांगली अनुकूलता आली आहे. नाणें फार जमून त्याचा भाव उतरूं लागला, अर्थात विकाऊ जिनसाची किंमत वाढली म्हणजे, तेथील व्यापारी नाणें परमुलुखीं जिन्न-

न खरेदी करण्यास नेतात. आणि इकडे किंमत चढली असें पाहून, परमुलखी व्यापारी तिकडचा माल इकडे पाठवून देतात, आणि इकडे जे जिन्नस महाग मिळतात, ते न घेतां, स्वस्त जिन्नस म्हणजे नाणें मोबदला घेतात.

**सोनें व रुपें या धातूंचा पैसा होतो. त्यांच्या भरती व खपाविषयीं सिद्धांत खालीं लिहिले आहेत.**

**पहिला सिद्धांत**— ज्या ठिकाणापासून सोनें मिळतें, त्याचें उत्पादकत्व जास्त वाढल्यावांचून, जर सोन्याचा खप वाढेल, तर सोन्याचें अंगमोल चढेल, व असें झाल्यास सोन्याचें मोल वाढेल, व साधारण सर्व मालांच्या किंमती उतरतील.

**दुसरा सिद्धांत**— दुसऱ्यापक्षीं जर चांगल्या खाणीचा शोध लागून, सोन्याचें अंगमोल उतरल्यास, त्याची भरती वाढेल, व त्याचें मोल उतरेल. परंतु जर अन्यदेशांत सोन्याचीं नाणीं पाडण्याची आवश्यकता एकसमयावच्छेदेंकरून उद्भवल्यास मात्र, त्याचें मोल उतरणार नाहीं. अशी स्थिति असल्यास, सोन्याचा खप वाढल्यामुळें जास्त मिळालेल्या सोन्याचें मोल न उतरतां खपून जाईल.

**तिसरा सिद्धांत**— दुसऱ्यापक्षीं जर सोन्याचा खप वाढण्याचा प्रसंग नसल्यास, सोन्याची भरती वाढेल, तर त्याचें मोल उतरेल. परंतु सोन्याच्या मोलांत कमतरता होणें म्हणजे साधारण सर्व प्रकारच्या किंमतीचें मान चढणें होय. मालाची किंमत चढली, तर प्रत्येक खरेदीच्या व विक्रीच्या प्रसंगीं जास्त पैशाची गरज लागते. यामुळें सोनें काढण्याच्या कारखान्यास तेजी येते. याप्रमाणें सोन्याच्या भरतीची खपाशीं समता होते, कारण सोन्याची भरती वाढल्यामुळें ज्या मानानें त्याचें मोल उतरतें, त्याच मानानें त्याचा खप वाढतो. जर सोन्याचें मोल अर्धे कमी झालें म्हणजे साधारण किंमतीचें मान दुप्पट झालें, तर सोन्याचीं नाणीं दुप्पट लागतील, ह्या समतेस खालील कारणांनीं मदत होते.

**पहिलें कारण**— सोन्याचें मोल जसजसें कमी होतें, तसतसा त्याचा उपयोग कलाकौशल्याचे कामीं होऊन, जास्त झालेल्या सोन्याच्या भरतीचा खप होतो.

**दुसरें कारण—** सोन्याचें मोल उतरल्यास त्याची भरती परिमित होऊं लागते. कारण सोन्याचे खाणीतील काम कमी कायदेशीर झाल्यानें, अति निकृष्ट खाणींत सोनें काढण्याचें बंद होतें.

---

# भाग ३

## परदेशव्यापार.

**परदेश व्यापारापासून श्रमविभागाची वृद्धि होतेः—** श्रमविभागापासून जसा फायदा होतो, तसाच परदेश व्यापारापासून होतो. देशादेशामध्यें व्यापार निर्बंधपणानें सुरू झाल्यापासून त्या देशांचे फायदे होतात. ते असे कीं ज्या देशामध्यें जो माल उत्पन्न करण्यास आयास पडत नाहींत, त्या देशामध्यें त्या मालाचे उत्पादनाची वृद्धि होते. व जो माल उत्पन्न करणें सुलभ नसतें, त्याचें उत्पादन कमी होनजातें. यामुळें मालाच्या उत्पादनास लागणारा खर्च कमी होतो. अशा प्रसंगीं श्रम आणि भांडवल यांचा उपयोग अत्यंत फलद्रूप होतो. पहा हिंदुस्थान देशांत अफू उत्तम प्रकारची विशेष आयास नपडतां उत्पन्न होते; व तसेंच चीनदेशांत चहा चांगला उत्पन्न होतो, यास्तव चायनी लोकांस लागणारी अफू इकडून जाते; व आम्हांस लागणारा चहा चिनांतून मिळतो. येणेंकरून उद्योगाची वांटणी होऊन श्रमविभाग वाढतो. व एकंदरींत अल्पश्रमानें उत्पन्न होणारा माल विनिमयानें परस्परांस मिळतो. हा मोठा फायदा आहे.

**व्यापारास प्रतिबंध असल्यानें सर्व समाजाचें नुकसान होतेः—** इंग्लंद व जर्मनी या देशांत मिठाच्या खाणी उत्तम असल्यामुळें तें तयार करण्यास त्या ठिकाणीं अगदीं आयास पडत नाहींत, हा त्या उभयदेशांस विशेष फायदा स्वाभाविकच आहे. आतां या दोन देशांकडून किंमतीनें स्वस्त, गुणानें चांगलें तयार करण्यास श्रम कमी — ग्राहकांस जणु सृष्टीची आयती देणगीच वाटेल.— असें उत्कृष्ट मीठ व्यापार

स अटक नसती, तर जेथें गुणानें सरासरीच व तयार करण्यास श्रम फार, अशा फ्रान्स देशांत रगड पुरवितां आलें असतें; परंतु फ्रेंच सरकार बाहेरून येणाऱ्या स्वस्त मिठावर जकात फार बसवितें, यामुळें गिऱ्हाइकांस चांगलें व स्वस्त मीठ मिळणें शक्य असतां, सरासरी व महाग असलें मीठ घेणें भाग पडून बरेंच नुकसान सोसावें लागतें.

आतां अशा प्रतिबंधानें फ्रान्स देशांतील मिठाच्या व्यापाराचें संरक्षण होतें, हें स्पष्ट आहे. परंतु इतर देशाच्या तुलनेवरून पाहतां, भांडवल व श्रम कमी फायदेशीर व्यापारांत घालावयास उत्तेजन दिल्यासारखें होतें. परंतु व्यापारास प्रतिबंध करूं इच्छिणाऱ्याचे लक्षांत हें येत नाहीं कीं, अशा कमी फायदेशीर व्यापारांत भांडवल व श्रम यांची योजना करण्यापेक्षां आपल्या देशांत कमी श्रम लागणाऱ्या मालाच्या उत्पादनांत जर हेंच भांडवल व हाच श्रम लाविला, तर कांहीं नुकसान होणार नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट त्यापासून जास्त नफा होईल. असें झाल्यानें सर्व देशांत संपत्तीच्या उत्पादनाची वृद्धि होऊन, देशांतील भांडवलही वाढेल. हें स्पष्ट आहे.

**एका उद्योगांतून दुसऱ्या उद्योगामध्यें भांडवल व श्रम काढून घालण्याचें एक उदाहरण सांगतोः—** इंग्लंदांतील शेतकऱ्यापेक्षां अमेरिकेंतील शेतकरी गहूं व चक्का दहीं इंग्लंदांत आणून स्वस्त विकितो. यामुळें इंग्लंदांतील शेतकऱ्यास विषम वाटून तो व्यापारास प्रतिबंध करा असें कधीं म्हणत नसतो. परंतु अमेरिकन लोकांपेक्षां जास्त सुलभ असा आपल्यास कोणता माल उत्पन्न करितां येईल, ह्याच्या शोधास लागून तो आपलें भांडवल त्या मालाचे उत्पादनाकडे लावितो, अशा प्रकारचा माल म्हणजे फुलें, फळें व भाजीपाला हा होय; व हा माल धान्यादिकाप्रमाणें दूरचे देशांतून पाठवितां येत नाहीं. कारण तो अल्पकाळांत कुजून नासणारा असतो. यामुळें अशा प्रकारचा माल उत्तरोत्तर उत्पन्न करण्याविषयीं तेथील शेतकरी यत्न करितील. सर्व गिऱ्हाइकांस अवश्य लागणारे पदार्थ स्वस्त मिळूं लागल्यामुळें, फुलें व फळें हे चैनीचे पदार्थ जास्त घेण्यास त्यांस सवड होणार आहे.

**व्यापारास प्रतिबंध केल्यानें कराचा बोजा गिऱ्हाइकांवर**

पडतोः— व्यापार मतिबंधेच्छु हे नेहमी गिन्हाइकांच्या हिताविषयीं विचार करितात, असें दिसत नाहीं; परंतु माल उत्पन्न करणाऱ्यांच्या हिताविषयीं मात्र ते विचार करण्यांत गुंतलेले असतात. व्यापारास मतिबंध करिते समयीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या मालाविषयीं मतिबंध केला असेल तो माल उपजीविकेस अवश्य असेल, तर एकंदर जनसमूहाच्या हिताविषयीं दुर्लक्ष करून, तो माल उत्पन्न करणाऱ्या परिमित लोकांच्या मात्र हिताकडे लक्ष पुरविल्यासारखें होतें. परंतु असें करणें इष्ट नाहीं. उदाहरण मागें सांगितल्याप्रमाणें फ्रेंच सरकारानें इंग्लंडाहून येणाऱ्या मिठावर कर बसविल्यानें, त्याचा परिणाम सर्व फ्रान्स देशावर कसा घडतो, तें पहा. पहिला तोटा उत्तम मिठाच्या ऐवजीं सत्वहीन मिठावर निर्वाह करणें भाग पडतें, व दुसरा त्या मिठाचा उपयोग शेतकीच्या व कलाकौशल्याच्या कामांत केल्यानें जो नवीन माल तयार होतो, तोही सत्वहीन होतो. आतां हा सत्वहीन माल वापरल्याच्या योगानें साक्षात् व परंपरा किती नुकसान होतें, याचें अनुमान कधींही करितां येणार नाहीं; परंतु किंमतीकडून जें नुकसान झालें, त्याचें अनुमान सत्यतेच्या जवळजवळ करितां येईल. व्यापार तत्व जाणणारे असें म्हणतातकीं, फ्रान्स देशांत मिठावरील जकातीमुळें, दर पौंडास अर्धपेनी जास्त किंमत द्यावी लागते. एकंदर फ्रान्स देशांत ३५ कोटि पौंड मिठाचा दरसाल खप होतो. तेव्हां एकंदरीन सुमारें साडेसातलक्ष पौंड फ्रेंच लोकांस जास्त द्यावे लागतात. हा त्यांस दंडचना! ह्या रकमेवरून इंग्लंडांतील मीठ उत्पन्न करणारे, व फ्रान्सांत मीठ उत्पन्न करणारे ह्या उभयतांची स्वाभाविक सोय व गैरसोय त्याचें सहज अनुमान होईल. ह्यासारखेंच दुसरें एक उदाहरण आहे तें पाहिलें म्हणजे चांगली खातरी होईल, (अ) आणि (ब) हे दोघे गृहस्थ एकमेकाच्या शेजारीं रहाणारे आहेत. (अ) च्या घरीं एक उत्तम पाण्याची विहीर आहे. (अ) नें (ब) स सांगितलें कीं, तू दरसाल चार पौंड मला देऊन, रोज पाहिजे तितकें पाणी घेऊन जा. तें (ब) नें नाकबूल केलें (ब) ची एक विहीर त्या घरापासून एक मैलावर होती. तिचें पाणी गोडीला कमी होतें. तेथून रोज एक घागर पाणी आणण्याकरितां एक मुलगा दर आठवड्यास ३ शिलिंग प्रमाणें दरवर्षास ७ पौंड १६ शिलिंग देण्याचें कबूल करून ठेविला. असें केल्यापासून (ब) नें आपलें तीन प्रकारचें नु-

कसान करून घेतलें २ पौंड १६ शिलिंग त्यास जास्त खर्च बसला. २ पाणी मुबलक नाहीं, उत्तम गोड पाणी मिळत होतें, तें सोडून सौळ पाण्यावर निर्वाह करावा लागला. अशीच फ्रेंच लोकांची स्थिति आहे.

**प्रतिबंधाचे रोजमुऱ्यावर परिणाम:**— प्रतिबंधित मालापैकीं, बहुतेक माल नेहमीं अवश्य लागणारे असतील, तर अशा प्रतिबंधामुळें रोजमुऱ्याचे दर कमी होतात. कारण त्यांच्या रोजमुऱ्यांच्या योगानें त्यास जित का माल मिळावा त्यापेक्षां तो कमी मिळतो. तोच व्यापार निष्प्रतिबंध असला, तर धारणीचें मान सवंग होतें; व तेवढ्याच रोजमुऱ्यावर जास्त माल मिळतो, व अशानें हजारों लोकांचा फायदा होतो. कोणताही अवश्य लागणारा माल सवंग मिळूं लागेल, तर पुढें दाखविलेल्या दोहों गोष्टींपैकीं कोणती तरी एक गोष्ट अवश्य झालीच पाहिजे. १ली तो माल उत्पन्न करण्यास खर्च तरी कमी लागला पाहिजे, अथवा मजूरदारांस जास्त बक्षीस दिल्यासारखें झालें पाहिजे म्हणजे त्यांच्या पूर्वीच्याच रोजमुऱ्यानें पूर्वीपेक्षां जास्त माल मिळूं लागतो. आतां दुसऱ्यापक्षीं माल सवंग होऊन जर रोजमुरे कमी होतील, तर मजूरांस बक्षीस पूर्वी इतकेंच दिल्यासारखें होतें. परंतु उत्पादनास लागणारा खर्च कमी होतो. वरील सर्व उपपादनावरून हें सहज ध्यानांत येईल कीं; परकीय राष्ट्रांच्याच चढाओढीमुळें, स्वकीयराष्ट्रांतील माल उत्पन्न करणाऱ्यांचा फायदा होण्यासाठीं व्यापारास प्रतिबंध केल्यामुळें होणाऱ्या काल्पनिक फायद्यापेक्षां, अवश्य लागणाऱ्या मालाची किंमत कमी झाल्यानें फायदे जास्त होऊं लागतात तसेंच अशा प्रकारचा माल सवंग झाल्यानें देशांतील भांडवलसंचयाची वृद्धि होते, म्हणून व्यापारप्रतिबंधेच्छु लोकांस सार्वजनिक फायदा होईल असें वाटत असतें; तें खरें नसून उलट अशा प्रतिबंधापासून वर दाखविलेले तोटे मात्र होतात.

**स्वदेशीय मालाच्या उत्पादनास उत्तेजन येण्यासाठीं, सरकारानें दिलेल्या आश्रयाचे वाईटपरिणामदर्शक उदाहरण:**— इंग्लंदांत पूर्वी क्लाईद व ब्रिस्तल येथें साखर करण्याचे मोठे कारखाने होते; परंतु त्यांत फायदा कमी होऊं लागल्यामुळें त्या कारखानदारांनीं आपले कारखाने बंद करून, त्यांतील भांडवल अन्य कारखान्यांत घात-

लें; त्याचें कारण फ्रेंच सरकार आपल्या साखर उत्पन्न करणाऱ्या लोकांस ती उत्पन्न करून बाहेर देशीं पाठविण्यास उत्तेजन देऊं लागलें, यामुळें फ्रान्सांतील साखर उत्पन्न करणाऱ्यांनां इंग्लंदांतील व्यापाऱ्यांपेक्षां आपली साखर त्या देशीं स्वस्त विकितां येऊं लागली. ह्या योगानें इंग्लंदांतील लोकांच्या उद्योगास कोणत्याही अर्थानें कमतरता आली नाहीं. कारण त्यांनीं आपलें भांडवल दुसरा माल उत्पन्न करण्याचे कामीं लाविलें; परंतु त्यांत फ्रेंच राष्ट्राचें मात्र नुकसान झालें. कारण त्या सरकारानें आपल्या कारखानदारांस जी मदत केली, व आश्रय दिला, तो पैसा प्रजेवरील करांपैकीं असल्यानें अंगमोलापेक्षांही कमी किमतीनें इंग्लिश लोकांस साखर मिळण्यासाठीं फ्रेंच राष्ट्रावर कर लादला गेला हें सहज दिसून येतें.

**उभयदेशांत ज्या मालाचा विनिमय होतो, त्याच्या सांबंधिक अंगमोलांत अंतर असल्यावांचून परदेश व्यापार फायदेशीर होत नाहीं:**– फ्रान्स देशांत चार हात-मोच्यांच्या जोड्यांला एक ग्यालन दारू येते. परंतु त्याच हातमोच्यांच्या जोड्यांस इंग्लंदांत सव्वा ग्यालन दारू मिळते. असा फरक असल्यामुळें हातमोच्यांचा व दारूचा विनिमय ह्या उभयदेशांत झाला असतां, उभय राष्ट्रांचा फायदा होतो. हा फरक निदान इतका असला पाहिजे कीं, परदेशी माल पाठविण्यास जो खर्च लागतो, तो भागून माल पाठविणाऱ्यास कांहीं नफा राहिला पाहिजे. कारण तो माल स्वदेशांत विकिला असतां, त्याची जी किंमत येते, तितकीच परदेशीं आल्यास, माल परदेशीं पाठविण्याचें जोखीम व खटपट कोण पतकरील? कोणीही पतकरणार नाहीं, हें उघड आहे.

**खप आणि भरती यांच्या समतेनें विनिमयाच्या आटीचें नियमन होतें:**–मालाच्या सांबंधिक अंगमोलाचें अंतराविषयीं व्याख्या केली आहे. परंतु माल पाठविण्यास लागणारा खर्च भागून, साधारण थोडा नफा मिळण्यापेक्षांही हें अंतर कांहीं काळपर्यंत जास्त असतें. उदाहरणार्थ आपण असें कल्पूं कीं, फ्रान्स देशांत एक टन कोळशाच्या मोबदला एक क्वार्टर गहूं मिळतात. आणि इंग्लंद देशा

त याचवेळीं तितक्याच कोळशाच्या मोबदला ½ कार्टर गहूं मिळतात. यावरून कोळशाचा व्यापार करणारा दुप्पट फायद्याच्या आशेनें आपला माल फ्रान्सदेशांत पाटवितो. त्या देशामध्यें प्रत्येक टन कोळशास ¾ कार्टर गहूं जास्त मिळतात. इतका सर्व नफा त्याच्या पदरांत पडेल कीं काय या प्रश्नाची समजूत होण्यासाठीं मागील भागांत मालाची किंमत, ही त्याच्या भरती आणि खप याच्या समतेनें ठरते, असें जें प्रतिपादन केलें आहे, त्याकडे वाचकानें लक्ष दिलें पाहिजे. आपण असें कल्पिलें आहे कीं, इंग्लंदांतील व्यापारी कोळसे देऊन त्याचे मोबदला फ्रान्सांतील गहूं घेतो. अशा घडामोडींमुळें इंग्लंद देशांत परदेशीय गव्हांची भरती जास्त होऊन, त्या देशांत उत्पन्न होणाऱ्या गव्हांचा खप कमी होतो, व फ्रान्स देशांत परदेशीय कोळशाची भरती जास्त होऊन, त्या देशांतील कोळशाचा खप कमी होतो हें उघड आहे. इतर मालाच्या स्थितींत बदल न होतां जर कोणत्याही एखाद्या मालाचा खप वाढेल, तर त्याची किंमत चढते. आणि त्याचा खप कमी होईल, तर किंमत उतरते. म्हणजे **कोणत्याही मालाच्या किंमतीचें नियमन भरती आणि खप यांच्या समतेनें होत असतें**, असें मागील भागांत सिद्ध झालें आहे. त्यावरून फ्रान्स आणि इंग्लंद या दोन देशांत गहूं आणि कोळसे याचा विनिमय होऊं लागल्यानें उभय देशांत त्या मालाच्या किंमतींत कमजास्तपणा होतो हें स्पष्ट आहे. म्हणजे इंग्लंड देशांत कोळशाची किंमत चढते; कारण त्याचा खप वाढतो. व गव्हांची किंमत उतरते कारण त्याची भरती वाढते याच्या उलट फ्रान्स देशांत गव्हांची किंमत चढते, कारण खप वाढतो; व कोळशाची किंमत उतरते, कारण भरती जास्त होते; यावरून आतां उभयदेशांत होणाऱ्या मालाचा विनिमय आरंभीं ज्या अटीवर सुरू झाला, ती आतां कायम राहणार नाहीं, म्हणजे कोळशाच्या मोबदला ¾ कार्टर गव्हांचें जें अंतर रहात होतें, तें आतां राहणार नाहीं. इंग्लंद देशांत कोळशाचे मोबदला मोल वाढेल. आणि फ्रान्सदेशांत तें उतरेल. व अशी स्थिति कायम राहिल्यास दोन्हीं देशांतील मालाच्या किंमतींमधील अंतर इतकेंच कायम राहील कीं, तेणेंकरून माल परदेशीं पाठविण्यास येणारा खर्च भागून साधारण नफा मा-

त्र मिळेल.

**आयातमालाची भरती खपाशीं सम कशी होते त्याविषयीं विवेचनः—** किंमतीच्या योगानें आयातमालाची भरती आणि खप यांची समता कशी होते, हें समजण्यास कांहीं अडचण राहणार नाहीं. आपण असें गृहीत घेतलें आहे कीं, इंग्लंडांतील व्यापाऱ्यास फ्रान्स देशांत कोळसे पाठवून त्याचे मोबदला प्रत्येक टन कोळशास एक क्वार्टर गहूं मिळाल्यामुळें अत्यंत नफा मिळतो यावरून इतर सर्व व्यापारीही असा नफा मिळविण्यासाठीं फ्रान्स देशामध्यें कोळसे पाठवूं लागतात. यामुळे फ्रान्सदेशांत कोळशांची भरती जास्त होते. म्हणून तो माल खपण्यासाठीं माल पाठविणाऱ्यांना त्याची किंमत उतरावी लागते. व याचवेळीं इंग्लंडामध्यें कोळशाची भरती कमी झाल्यामुळें या देशांत त्याची किंमत चढते, म्हणून कोळसे बाहेर पाठविण्याचा जो व्यापाऱ्यांचा झोक असतो, त्याचा बंदोबस्त दोन प्रकारांनीं होतो.

**१ इंग्लंडामध्यें कोळशाचे मोबदला मोल वाढतें.**

**२ फ्रान्सदेशामध्यें त्याचे मोबदला मोल उतरतें:—** यामुळें पूर्वीप्रमाणें प्रत्येक टन कोळशास १ क्वार्टर गहूं इतका जास्त फायदा नसून, फक्त तो माल पाठविण्यास लागणारा खर्च भागतो व तो माल पाठविण्याचें जोखीम भरून येतें. इतकीच प्राप्ति होऊं लागते.

**दोन देशांत मालाचा विनिमय होऊं लागतो, त्यावेळीं प्रत्येक देशाचा फायदा हा त्या देशांत आयात मालाचा जो खप होतो, त्या खपाशीं व्यस्त प्रमाणांत असतो:-** उभय देशांतील मालाच्या विनिमयप्रसंगीं ज्या देशांत आयात मालाच्या खपाची कमतरता असते, त्या देशाचा अत्यंत फायदा होतो. पहा इंग्लंड व फ्रान्स या देशांत कोळसे आणि गहूं ह्या मालाचा वर दर्शविलेला विनिमय चालला असून, जर फ्रान्स देशांत कोळशांचा खप जास्त वाढेल, तर इंग्लंडातील व्यापाऱ्यांचा कोळशांचा विनिमय फायदेशीर रीतीनें होईल. फ्रान्सदेशांत कोळशाचें मोल वाढल्यामुळें कोळशाच्या व्यापाऱ्यास आपल्या मालाऐवजीं पूर्वीपेक्षा जास्त माल मिळूं लागेल. परंतु ही स्थिति कायम राहणार नाहीं. कारण इतर सर्व व्यापारी आपले कों-

कसे फ्रान्स देशांत पाठवूं लागतील. या योगानें त्या देशांत कोळशाची भरती
जास्त झाल्यानें, त्याचें वाढलेलें मोल उतरूं लागेल. तें वाढलेलें मोल काय-
म राहतें असें मानिल्यास, खप वाढल्यामुळें कमी उत्पादक खाणींतून कोळ-
से काढावे लागतील. यामुळें त्याचें अंगमोल वाढेल, हें सहज ध्यानांत
येईल.

ज्याज्या देशांत ज्याज्या मालाचें उत्पादन अल्प
श्रमानें व कमी भांडवलानें होतें, त्या त्या देशांत तो तो मा-
ल उत्पादन करण्याच्या उद्योगांत भांडवलाची योजना जा-
हल्यानें, सर्व जगाच्या उत्पादक शक्तीची वृद्धि होते:– हा
व्यापारापासून मोठा फायदा आहे, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. व त्या
तत्वाच्या अनुरोधानें मालाचें उत्पादन अत्यंत कमी श्रमानें व थोड्या भां-
डवलानें होतें, सबब तसें करण्याविषयीं प्रत्येक राष्ट्रानें यत्न करावा. व्या-
पारसंबंधानें अर्थशास्त्रवेत्त्या मिलसाहेबाचें प्रतिपादन येथें लिहितो. लो-
कांची अशी समजूत असते कीं, व्यापारापासून देशाचा फायदा काय
होणार आहे. त्यापासून फक्त व्यापारी लोकांचा मात्र फायदा होतो.
असा त्यांचा ग्रह झालेला असतो. परंतु त्यापासून गिऱ्हाइकांस मा-
ल सवंग मिळतो. हा फायदा त्यांच्या ध्यानांत येत नाहीं. असें उघड
होतें व्यापार म्हटला म्हणजे कोणत्याही मालाचें उत्पादन कमी खर्चा-
नें होण्याचें एक साधन होय, व त्यापासून गिऱ्हाइकांस ज्या ठिकाणीं
जो माल उत्पन्न होऊन, मिळणें शक्य नसतें, त्या ठिकाणीं तो माल त्यांस
मिळतो हा केवढा मोठा फायदा आहे. बरें यावरून व्यापारी म्हणजे नि-
वळ गिऱ्हाइकांचे हिताचा विचार करितात असें नसून, फक्त आपला
माल खपून आपल्यास नफा मिळावा, एवढाच त्यांचा हेतु असतो. गि-
ऱ्हाइकांस माल सवंग मिळावा, याविषयीं ते काळजी बाळगितात अ-
सें नसून, फक्त नफ्याकडे मात्र त्यांची दृष्टि असते. तथापि व्यापारापा-
सून हे दोनही हेतु सिद्धीस जातात, हें निर्विवाद आहे.

राष्ट्राराष्ट्रामध्यें व्यापार चालल्यानें अर्थशास्त्रसंबंधीं अनेक फा-
यदे होतात, हें तर वरील उपपादनावरून स्पष्ट झालेंच आहे. असा
व्यापार चालल्यापासून राष्ट्रांची नीति व हुशारी यांमध्येंही सुधारणा

होत जाते. कारण राष्ट्रांचे परस्परांशीं दळण वळण सुरू झाल्यानें, ज्या देशांत जो माल उत्पन्न होण्यासारखा असतो, व त्याचा खप परदेश व्यापारामुळें वाढत जातो, तो माल उत्पन्न करण्यांत तें तें राष्ट्र गुंग होतें. यामुळें जगामध्यें शांतता राहण्याचें हें मोठें साधन होतें. व अशा दळणवळणाच्या वृद्धीपासून प्रत्येक राष्ट्रास आपले कायदे, कारखाने, रीतिभाति त्या बाबतींत दुसऱ्या राष्ट्राशीं तुलना करितां येते. व आपल्या देशांत ज्या न्यूनता असतात त्या सुधारतां येतात. असे अनेक फायदे व्यापारापासून होत असल्यानें, त्यापासून एका देशाचें नुकसान होऊन, दुसरा देश सधन होतो ही समजूत चुकीची आहे, असें सहज समजेल.

**व्यापारास प्रतिबंध केल्याचे परिणामाचा उपसंहारः**—व्यापाराची बंदी केली असतां देशाची संपत्ति, उपभोग व नांदणूक इत्यादिकांची वृद्धि न होतां, उलट त्यांस उतरता पाया लागतो. यासाठीं व्यापाराची बंदी असूं नये. या पृथ्वीवरील सर्व देशांस परस्परांशीं व्यापार करण्याची मोकळीक असावी. पूर्वीचे राज्यव्यवस्था कर्ते लोक होऊन गेले, ते अमुकदेशाशीं व्यवहार करूंनये, असा प्रतिबंध करीत असत. यावरून स्वार्थावर लक्ष ठेऊन अथवा चांगल्या लोकव्यवहारांत त्यांची दृष्टी पोंचली नसावी, यास्तव व्यापारास प्रतिबंध करीत असत, असेंच म्हणणें भागपडतें. वस्तुतः व्यापारापासून कोणाएका देशाचा नाश झाला, असें तर कोठें आढळत नाहीं.

**व्यापाराची प्रवृत्ति असावी असा ईश्वरी संकेत दिसतोः**—परसुलखीं धान्यादिक वस्त्र, पात्र, असे अनेक प्रकारचे पदार्थ विकत घेतले असतां जसे थोडक्या मोलानें, व थोडक्या खर्चानें आपलेकडे उत्पन्न होते. तसें करितां येते, तर परदेश व्यापाराची प्रवृत्ति झाली नसती. परंतु ईश्वराचा संकेत विलक्षण आहे. त्यानें नाना देशांत हवा पाणी इत्यादिकांचे ठायीं निरनिराळे गुण ठेऊन, निरनिराळे पदार्थ उत्पन्न व्हावे असें करून ठेविलें आहे, म्हणून मनुष्यमात्रानें अनेक देशांबरोबर, मोठमोठ्या दूर दूर ठिकाणच्या लोकांबरोबर व्यवहार व्यापार करून परस्परांचें हित व कल्याण करून घ्यावें, असा ईश्वराचा संकल्प स्पष्ट दिसतो.

जसे देश निरनिराळे असतात तसा तेथील भूमि, ऋतु व ते-

थील उत्पन्न होणारे प्रकृतिसिद्ध पदार्थ निरनिराळे असतात. म्हणून जसें एकाच मनुष्यास अनेक प्रकारच्या विद्यांत व कलांत निपुणता संपादणें अशक्य असतें; तसेंच एकदेशीं अनेक प्रकारचे पदार्थ उत्पन्न करणें अशक्य आहे. यास्तव तो मिळण्यास व्यापार हाच उत्तम मार्ग आहे. या पृथ्वीवरील सर्व लोक व्यापाररूपी एक कुटुंबच आहे. कुटुंबांतील माणसें जशीं एकमेकांच्या आश्रयानें वागतात, तसें परस्पराचे आश्रयानें मनुष्यमात्रानें वागावें, म्हणून जसे वेगळाले देश तसे तेथें वेगळाले पदार्थ ईश्वरानें निर्माण केले आहेत. जशी उपभोग घेण्याची इच्छा तशी उपभोग्य पदार्थ उत्पन्न करण्याची शक्ति हीं कोठें अधिक व कोठें कमी अशा मानानें मनुष्याचे ठायीं ठेविली आहे. पूर्वींच्या लोकांत व्यापारसंबंधी परस्पर दळणवळण कमी असल्यानें, सांप्रत काळच्या लोकांप्रमाणें त्यास उत्तमसंपत्तीचा उपभोग कोठून होणार.

**जे जे लोक व्यापारास प्रतिबंध असावा असें म्हणतात त्यांची त्यांची हरकत ही असते कीं, कोणतेंही राष्ट्र जो माल बाहेर पाठवितें, त्याचें मोल त्या राष्ट्रांतच चढतें व जो माल बाहेरून येतो, त्याचें मोल उतरतें:—** ही त्यांची हरकत अनुभवावरून खरी ठरते. कारण निर्गत मालाचा खप वाढल्यानें, तो महाग होतो; व आयातमालाची भरती जास्त झाल्यानें त्याची स्वस्ताई होते. इंग्लंड देशास धान्यादिक अवश्य लागणाऱ्या मालाचा पुरवठा अमेरिकेंतून होतो; व त्या मोबदला इंग्लंडांतून कलाबतू दारू वगैरे चैनीचे पदार्थ अमेरिकेंत पाठविले जातात. यावरून वरील हरकत खरी वाटते. कारण या विनिमयापासून अमेरिकेंत चैनीचे पदार्थांची किंमत उतरतें व अवश्य लागणाऱ्या धान्यादि मालाची किंमत चढते. तथापि व्यापारापासून होणारा मुख्य फायदा त्यांच्या ध्यानांत आला नाहीं असेंच म्हणणें भाग पडतें. तो फायदा म्हणजे राष्ट्रीयश्रमविभागाची वृद्धि हा होय. सर्व देशांत सर्वच माल उत्पन्न होतात असें नसून प्रत्येक देशांत कांहीं विशेष मालाचें उत्पादन कमी श्रमानें व कमी भांडवलानें होण्याची विशेष योग्यता असते. यास्तव प्रत्येक देशानें आपला माल परदेशीं पाठवून, त्या मोबदला आपणास लागणारा माल अन्य देशांतून आणावा यांतच सर्व

देशाचा फायदा आहे. व अशी गोष्ट घडण्यास व्यापार हाच उत्तम मार्ग आहे. सबब व्यापारास प्रतिबंध करणें हें कोणत्याही अर्थानें योग्य ठरत नाहीं. परंतु युनायटेड स्टेटमध्यें व्यापारास प्रतिबंध असल्यानें मनुष्याच्या निर्वाहास त्या देशांत जितका खर्च येतो, तितका कोणत्याही अन्य देशांत येत नाहीं.

---

# भाग ४

## पत.

**पत म्हणजे काय?** पत ही देशांतील उसनवारीची देवघेव दर्शविते, व ह्या देवघेवीचा व्यापार होण्यास मुख्य कारण भरवसा हें होय. पहा जेव्हां कोणी मनुष्य आपला माल दुसऱ्याचे हवालीं करितो, तेव्हां तो माल आपल्यास लागेल त्या वेळीं त्यापासून परत मिळेल, असा त्याचा भरवसा असतो यामुळेंच तो आपला माल दुसऱ्यास त्याची गरज भागण्यासाठीं देतो. ह्या सर्व व्यवहारामध्यें भरंवसाच मुख्य कारण आहे. भरंवसा नसल्यास उसनवारीची देवघेव होणार नाहीं हें उघड आहे. ह्यावरून भरंवसा हीच **पत** होय. उसनें देणाऱ्यास **धनको** म्हणतात. व घेणाऱ्यास **रिणको** म्हणतात.

सर्व सुधारलेल्या देशांत पतीनें व्यवहार होण्याचा प्रचार पडलेला आहे. पहा कोणी एक मनुष्य बाजारांत जातो, परंतु बरोबर पैसा नसतां, लागेल तो माल पतीवर घरीं आणितो; व व्यापारीही त्यास देतात; नंतर कांहीं दिवसानें तो आणिलेल्या मालाच्या किंमतीबद्दल पैसा देतो. ही पत सर्वांची सारखी नसते. कित्येकांची कमी असते व कित्येकांची जास्त असते. कारण एका मनुष्यास कांहीं पैसा लागल्यास हलक्या व्याजानें म्हणजे शेंकडा ६ रुपये प्रमाणें मिळतो व दुसऱ्यास शेंकडा २४ रुपये व्याज पडतें. ह्यावरून पत कमजास्त असते हें सहज समजेल.

हीच व्यक्तिविषयक गोष्ट राष्ट्रासही लागू पडते. इंग्लंड वगैरे देशांपेक्षां टर्कीस जबर व्याज द्यावें लागतें.

**पतीस भांडवल म्हणणें निरर्थक होयः-** संपत्त्युत्पादनास संचित करून ठेविलेलें जें धन, त्यास भांडवल म्हणतात. व त्यापासून मजुरांचा निर्वाह चालतो, व त्यांस लागणारीं हत्यारें व इतर सामान मिळते. पत ही उसनवारीची देवघेव दर्शविते. भांडवलापासून जीं पोषणादिक कार्यें होतात, तीं पतीनें होतील काय? होणार नाहींत. फक्त पत ही भांडवल मिळण्यास कारणीभूत होते एवढें मात्र खरें आहे. हें उदाहरणानें व्यक्त करितों. एकादा सशक्त मनुष्य आपल्या सामर्थ्यानें एक मण तांदळाचें पोतें उचलतो, एवढ्यावरून त्याचे शक्तीसच एक मण तांदूळ म्हणणें हें योग्य ठरेल काय? तसेंच पतीस भांडवल म्हणणें योग्य ठरणार नाहीं. म्हणून पतीस भांडवल म्हणणें भ्रांतिमूलक असून, निरर्थक होय.

**पेढी (ब्यांक)** जेव्हां देशांत असणाऱ्या संपत्तीचा मोठा अंश भांडवल रूपानें संपत्युत्पादनास कारणीभूत होतो, तेव्हां देशाचा खरोखर मोठा फायदा होतो. व देशांतील संपत्ति भांडवलरूपानें उपयोगी पडण्यास पतच कारण होते; पत नसल्यास असा फायदा होणार नाहीं. हें उदाहरणानें स्पष्ट करितों. प्रत्येक मनुष्य आपला प्रपंच भागवून कांहीं थोडा पैसा शिल्लक ठेवितो. परंतु एवढ्याशा लहान रकमेनें त्याचे हातून कोणतेंच संपत्युत्पादनाचें काम होईल काय? होणार नाहीं. असेंच पुष्कळ लोक असतात व ते स्वतः कोणताही धंदा चालविण्यास समर्थ नसतात. असे लोक आपली थोडीशी रकम व्याजानें ज्या ठिकाणीं ठेवितात त्यास **पेढी** म्हणतात. पेढी चालविणारांस **पेढीवाले** म्हणतात. व त्यांची पत सर्व मान्य असते. अशा पेढ्या देशांत नसत्या तर व्यक्तिमात्राच्या थोड्याशा शिलकेनें कोणताच धंदा चालला नसता, व सर्वांचे शिल्लक राहणाऱ्या थोड्या धनाचा अनुत्पादक व्यय झाला असता, व देशाची संपत्ति वाढण्यास प्रतिबंध झाला असता. परंतु पेढ्या असल्यामुळें अशा लहान-लहान रकमा एकत्र जमून त्यांपासून संपत्युत्पादनास मोठी मदत होते. पेढीवाले दीर्घ अनुभवावरून आपल्या जवळच्या रकमेचा ⅓ नेहमीं रो-

ख शिल्लक ठेवितात. कारण कोणी आपला पैसा परत मिळण्याचें मागणें करील, तर तो त्यांस परत देतां येतो, व पेढीची पत राहते. अशा प्रकारच्या पेढ्या मुंबईस स्थापन झाल्या आहेत. व अलीकडे पोस्टखात्याकडे अगदीं लहान रकमा ठेवण्याच्या पेढ्या सुरू झाल्या आहेत (त्यांस सेव्हिंग्स-ब्यांक म्हणतात.) ह्या सर्व पेढ्या सरकार चालवितें. व सरकारची पत सर्वमान्य असल्यामुळें, लाखों रुपये सरकारी पेढ्यांमध्यें लोक ठेऊं लागले आहेत. परंतु पाश्चिमात्य राष्ट्रामध्यें पत वाढल्यामुळें तिकडे खासगी पेढ्या पुष्कळ स्थापन झाल्या आहेत, तशी पत आमच्या राष्ट्रांत नाहीं, ही मोठी दिलगिरीची गोष्ट आहे. व अशा पतीच्या अभावामुळेंच आम्हां सर्वांस सरकारी पेढ्यांचा आश्रय करावा लागतो.

**सर्कतीनें व्यापार करणारी मंडळीः-** अशी मंडळी स्थापन होण्यास मुख्य कारण पत आहे;व अशी मंडळी स्थापन झाल्यानें देशांतील वाढलेल्या भांडवलाचा उपयोग संपत्युत्पादनाचे कामीं फार होतो. अशा अनेक मंडळ्यांची स्थापना इग्लंड वगैरे युरोपांतील देशांत झालेली आहे. पहा, आगगाडीचा एक कारखाना सुरू करावयाचा आहे. त्यास विपुल भांडवल लागतें. तें कितीही श्रीमान् अशा एका व्यक्तीकडून मिळणें शक्य नसतें, परंतु दसका लकडी एकका बोजा या म्हणीप्रमाणें वरील प्रकारची मंडळी वर्गणीनें लाखों रुपयांचें भांडवल जमवितें. तो प्रकार असाः- या कारखान्यास सुमारें ४० लाख रुपयांचें भांडवल पाहिजे. असा अंदाज होतांच, ५० रुपयांचा एक हिसा असे ८० हजार हिसे यास मंडळी पाहिजे आहेत. अशी जाहिरात देण्यांत येते. जाहिरात देणाऱ्यांची पत सर्वमान्य असल्यानें, तें भांडवल ८० हजार वर्गणीदारांकडून थोडयाच काळांत जमा होतें. जो इसम ह्यांपैकीं एक हिसा घेतो, तो एवढ्या मोठ्या अचाट कारखान्याचा भागीदार होतो. व त्याचें जें लहानसें ५० रुपयांचें भांडवल असतें, तें त्यास संपत्तीच्या भावी उत्पादनाकडे लावितां येतें; परंतु जर अशा प्रकारची सर्कतीनें व्यापार करणारी मंडळी नसती, तर त्याच्या अल्पभांडवलाचा अनुत्पादक व्यय झाला असता. असा अनुत्पादक व्यय युरोपखंडांतील इंग्लंड वगैरे सुधारलेल्या देशांत अशा साधनामुळें होत नाहीं. परंतु या देशांत तशा साधनाचा अभावच असल्यानें व्यक्तिमात्रांच्या अशा

अल्प रकमांचा अनुत्पादक व्यय होतो, हें मोठें हानिकारक आहे. अशा मंडळ्यांचे संस्थापक व नियामक ह्यांना जें यश मिळतें, तें केवळ त्यांच्या लोकमान्य पतीनेंच मिळतें, हें निर्विवाद आहे. ह्या सर्व उपपादनावरून पत असल्यामुळें देशांतील सर्व भांडवलाची संपत्युत्पादनाचे कामीं योजना होऊन संपत्तीची वृद्धि कशी होते यास इंग्लंड वगैरे पाश्चिमात्य राष्ट्रें हींच मूर्तिमान् उदाहरणें आहेत.

वरील उपयोगाशिवाय पत असल्यानें देशांतील संपत्तीचा विनिमय सुकर होण्यास व मालाच्या किंमतींत कमजास्त होण्यास खालील गोष्टी कारणीभूत होतात. त्याः- **१ हुंडी २ पेढीवाल्याच्या चिठ्या. (ब्यांकनोटा)** ३ हुंड्या.

**हुंड्यांविषयीं:-** जर सोलापूरचा व्यापारी शंभर रुपयांचीं लुगडीं मुंबईचे व्यापाऱ्याकडे पाठवील, तर एथून तिकडे शंभर रुपयांचे विलायती कापड पाठविलें पाहिजे; अगर दुसरा त्यास लागणारा माल पाठविला पाहिजे. असें न होईल तर शंभर रुपये पाठवावे लागतील. परंतु असें नाणें पाठविणें यांत जोखीम व अडचणी आहेत. अशा अडचणी टाळण्यासाठीं व पैसा पाठविण्यास सुलभ मार्ग होण्यासाठीं हुंडी पाठविणें हें उभयपक्षीं फार सोईचें आहे.

**हुंडीची व्याख्या:-** हुंडी ही ब्यांकनोटीप्रमाणें कागदाचा पैका आहे, हुंडी केवळ ब्यांकनोटीसारखी नसते. असुक ऐवज अमक्यास द्यावा म्हणून दुसरे गांवींचे राहणारावर जी चिठ्ठी देतात, ती हुंडी होय. कोणा व्यापाऱ्यानें आपला माल कोणाकडे पाठविला म्हणजे त्या मालाचा ऐवज अमुक तारखेस ज्याचें नाव हुंडींत लिहिलें आहे, त्यास द्यावा अशी हुंडी माल खरेदी करणारावर तो व्यापारी लिहून पाठवितो. कोणे समयीं असें घडतें कीं, मुंबईचा व्यापारी सुरतेस माल पाठवितो, आणि तो माल ज्या व्यापाऱ्याकडे पाठविला त्याजवर हुंडी लिहून पाठवावयाची ती न पाठवितां, तिचा ऐवज मुंबईतच घेण्याची तजवीज करितो. ती अशी:-सुरतेस ऐवज पाठविणाऱ्या सावकाराची गांठ पडली तो सावकार सांगतो कीं मला सुरतेंत अमुक दुकानाचे अडत्यास ऐवजाचा भरणा करावयाचा आहे. तो ऐवज येथें मी तुम्हांस देतों, म्हणजे सुर-

तेस ऐवज पाठवावयाची मेहनत पडणार नाहीं. मग हा सावकार त्या माल पाठविणारापासून ती हुंडी घेऊन त्यास ऐवज देऊन, त्या हुंडीवर मला अथवा सुरतेच्या माझ्या अडत्यास हुंडीचा ऐवज घेणें असें लिहून, ती हुंडी सुरतेस आपल्या अडत्याकडे पाठवितो. तो ज्यावर ती हुंडी लिहिली असेल, त्यापासून त्या हुंडीचा ऐवज घेतो. तेव्हां जसा मुंबईचे सावकारास घर बसल्या आपला ऐवज मिळतो, तसाच सुरतेच्या व्यापाऱ्यानें मुंबईच्या व्यापाऱ्यावर माल पाठविल्यास त्याची किंमत अशा युक्तीनें त्या व्यापाऱ्यास सुरतेंत मिळेल. यावरून व्यापारांत हुंडीचा फार उपयोग आहे, व हिच्या योगानें पैसा पाठविण्याची मोठी सोय होते. देशांतल्या देशांत व्यापार चालला असतां हुंडीचा उपयोग फार होतो, हें वरील उपपादनावरून वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. असाच परदेश व्यापारांतही हुंड्यांचा उपयोग फार होतो, हें स्पष्ट करितों. दोन देशांत व्यापार होत असला आणि इकडून जितका माल पाठविला तितकाच तिकडून आला, तर ऐवजाच्या हुंड्यांच्या रकमाबरोबर होतील, व तो ऐवज न पाठवितां घरीं बसल्याच पोंहोंचेल. पहा इंग्लंडांतील व्यापारी अ हा हजार रुपयांचें कापड हिंदुस्थानांतील ब नामक व्यापाऱ्याकडे पाठवितो. व हिंदुस्थानांतील क नांवचा व्यापारी तितक्याच किंमतीचे गहूं इंग्लंडांतील ड नांवच्या व्यापाऱ्याकडे पाठवितो. ही हुंडीचिठ्यांची वहिवाट नसती तर ब स हिंदुस्थानांतून अ कडे १००० रुपये रोख पाठविणें भाग पडलें असतें; तसेंच ड यास इंग्लंडांतून १००० रुपये हिंदुस्थानांत क कडे पाठवावे लागते. इतक्या अंतरावर रोख पैसा पाठविण्याचें काम मोठ्या जोखमीचें झालें असतें. परंतु अशी भानगड हुंडीमुळें वांचते, ती अशी; ब हा हिंदुस्थानांतून १००० रुपयांची हुंडी अ कडे पाठवितो; त्यांत १००० रुपये देण्याचें प्रवचन केलें असतें. तसेंच इंग्लंडांतून ड व्यापारी अशा प्रकारची चिठी हिंदुस्थानांतील क व्यापाऱ्याकडे पाठवितो. अशीं प्रवचनें ज्यांत केलेली असतात त्यांसच हुंडी म्हणतात. अ कडे हिंदुस्थानावर काढलेली हुंडीचिठ्ठी आहे. व क कडे इंग्लंडावर काढलेली हुंडीचिठ्ठी आहे. या उभयतांनीं या चिठ्यांचा विनिमय केला म्हणजे परस्परांचे कर्जाची फेड होते. व प्रत्यक्ष पैसा पाठविण्याची भानगड दूर होते.

मालाची किंमत अधिक उणी असल्यास उभय देशांची देवघेव कशी होते तो प्रकार असा:- आपला व्यापार इंग्लंडदेशाबरोबर चालला असला; आणि आपण जितक्या किंमतीचा तिकडे माल पाठविला; तितक्याच किंमतीचा तिकडून येऊं लागला, तर आपला व त्यांचा समसमान व्यापार चालला आहे असें होईल,परंतु जर त्यांनीं आपल्याकडे कापड पाठविलें, त्याची किंमत आपल्याकडील कापूस गेला त्याचे पेक्षां अधिक झाली, तर त्यांजकडून आपल्यावर अधिक हुंड्या येतील; व आपल्याकडून त्यांवर कमी हुंड्या होतील. हुंड्यांनीं जितकी देवघेव व्हावयाची तितकी होऊन त्यांची बाकी आपल्यावर निघेल, त्याबद्दल आपल्याला नाणें पाठविलें पाहिजे. अशा प्रसंगीं जास्त निघणारी बाकी नाणें पाठवून भागविली पाहिजे. एकूण नाणें पाठविण्याची दगदग चुकत नाहीं. नाणेंच परभुलखांत पाठविलें पाहिजे. नाणें पाठविण्यास विम्याचा वगैरे खर्च बसतो म्हणून नाणें पाठविण्याचा प्रसंग जों पर्यंत टळेल, तों पर्यंत व्यापारी टाळूं पाहतात, तो प्रकार असा. इंग्लंडचे व्यापाऱ्यांवर आपल्याकडून ज्या हुंड्या व्हावयाच्या त्याची कमती झाली, म्हणजे आपल्याकडले जे व्यापारी त्यांचे देणेंदार असतात, ते त्या हुंड्या घेण्याविषयीं मोठे आतूर होतात. एक म्हणतो मला हुंडी पाहिजे. दुसरा म्हणतो मला पाहिजे याप्रमाणें हुंड्यांचीच चणचण झाली म्हणजे, त्या हुंड्यांची किंमत चढते. कारण जी हुंडीची रकम आहे, त्यापेक्षां अधिक दिलें तर पुरवेल परंतु कापड घेतलें आहे, त्याबद्दल नाणें विलायतेस पाठविणें पुरवणार नाहीं. असा जो अधिक ऐवज हुंडीचे रकमेपेक्षां देतात. त्यास मंडावणी असें म्हणावें. तेव्हां इंग्लंडचे सावकाराचा जो ऐवज आपल्याकडल्या सावकारावर निघत असेल, त्यानें जास्ती द्यावें असें सिद्ध होतें. होय, त्या हुंड्यांची जशी कमती असते, तसा मंडावणीचा ऐवज अधिक द्यावा लागतो, व हा ऐवज जास्त लागल्यास त्याजकडे नाणें पाठविणें बरें, परंतु जसजसा देश फार दूर असतो व पैसा पाठविण्याची जसजशी गैरसोय असते तसतसा पैसा पाठविण्यास जास्त खर्च लागतो, असें वर सांगितलें आहे. व इकडील सावकारास हुंड्या मिळाल्या नाहींत, तर पैसा पाठविलाच पाहिजे. परंतु अशा प्रसंगीं कितीएक व्यापारी हुंड्यांचा व्यापार करीत अस-

तात ते हुंड्या पुष्कळ स्वस्त असल्या म्हणजे, इतर मालाप्रमाणें वि-
कत घेऊन त्या कमती व महाग झाल्या म्हणजे विकितात. आप-
ल्याकडून विलायतच्या सावकारावर झालेल्या हुंड्यांची कमती झा-
ली म्हणजे, विलायतच्या सावकारावर दुसऱ्या देशांतून झालेल्या हुं-
ड्या आपले हुंडीवाले खरेदी करितात. आणि आपल्या बाजारांत त्या
हुंड्यांचा व्यवहार करितात.

**हुंडीवाले धोरण ठेवितात तें:-** इंग्लंड देशावर कोणत्या
देशच्या हुंड्या जास्त झाल्या आहेत, व कोणत्या देशच्या कमी झा-
ल्या आहेत, त्या बेतानें त्या हुंड्या एका ठिकाणीं खरेदी करून, त्या
दुसऱ्या ठिकाणीं विकितात. अशा धोरणामुळें आमच्यावर इंग्लंडचा
जो चढलेला ऐवज असतो,तो त्या हुंड्या आपण घेतल्या असतां दिला
असें होईल. या सर्व उपपादनावरून पैशाचें काम त्या कागदाच्या चि-
ठ्यानें कसें होतें, व व्यापाराची कशी वृद्धि होते, हें वाचकांस कळू-
न येईल.

**पेढीवाल्यांच्या चिठ्या ( ब्यांकेच्या नोटा ):-** हुंडीप्रमाणेंच
नोटांचा उपयोग करितां येतो. उभयतांमध्यें भेद इतकाच कीं, हुंड्या
त्यांत लिहिलेल्या मुदतीपर्यंत चालतात, व नोटा सर्वकाळ चालतात.
अशा प्रकारच्या नोटा उपयोगांत आणिल्यामुळें सोन्यारुप्याचीं नाणीं
वाढविल्यासारखीं होतात. आतां नाणीं वाढल्यापासून जसा किमतीं-
त फेरफार होतो, तसाच त्या नोटांपासूनही होतो. ब्यांकेच्या नो-
टा पैशा मोबदला किती उपयोगी पडतात हें सर्वांस माहीतच आ-
हे. त्यांचा आकार लहान असल्यामुळें जवळ बाळगण्यास त्या मो-
ठ्या सोईकर असतात, तसें पैसे बरोबर बाळगणें सोईकर होत ना-
हींत. आतां त्याच्या मोबदला, त्या नोटा सरकारानींच काढल्यामुळें,पै-
सा कसा मिळेल अशी भ्रांति लोकांस मुळींच नसते. म्हणून पैशा-
च्या ऐवजीं नोटांचा उपयोग व्यवहारांत जारीनें सुरू आहे. खा-
सगी पेढीवाल्यांनीं काढिलेल्या नोटांवर ज्या लोकांचा पूर्ण विश्वास अ-
सतो, त्या लोकांतच त्या चालतात. एकंदरींत हें उघड आहे कीं, हल्लीं
चालू असलेल्या नाण्यापैकीं जर एखादें नाणें बंद केलें, व त्याच्या ऐ-

वजी नोटा सुरू केल्या तर त्यांच्या योगानें किंमतींत फेरफार होत नाहीं. परंतु नाण्याची संख्या जर कायम राहील व नोटा वाढतील तर सामान्यतः किमती चढतील. निदान उतरण्यास प्रतिबंध तरी होईल.

**पतीमुळें किंमतीवर होणारें कार्य फायदेशीर असतें:-** वरील सांगितलेली पतीची घडामोड ज्या ठिकाणीं परिमित असते, त्या ठिकाणीं तिचे किंमतीवर होणारें कार्य फायदेशीर असल्यानें सर्व समाजाचें हित होतें; कारण अशा व्यवहारानें किंमतीमध्यें फेरफार होण्याचें बंद पडतें. यामुळें व्यापार सुरळीत चालून मालाचें उत्पादन अबाधित चालतें. जसजसा क्रयविक्रय जास्त होतो, तसतशी जास्त पैशाची गरज लागते. आणि जर पैसा किंवा पैशाच्या मोबदला चालणारीं दुसरीं साधनें मिळणार नाहींत, तर किंमती उतरल्या पाहिजेत, असें मागें सांगितलें आहे. जर एखाद्या व्यापाऱ्यानें आपल्या मालाचा क्रयविक्रय दुप्पट केला, तर खरोखर त्यास हुंड्याहीपूर्वीच्या दुप्पट लागतील. म्हणून जसजसा व्यापार वाढत जातो, तसतशी पतीच्या उपयोगाची वृद्धि आपोआप होऊं लागते. आतां ज्या मानानें क्रयविक्रय कमी होतो, त्या मानानें हुंड्यांची आवश्यकता कमीच पडूं लागते. जरपतीचा उपयोग व्यवहारांत घडणार नाहीं, व व्यापार वाढत चालला, तर किंमती उतरूं लागतील. परंतु जर व्यापारास मंदी येईल तर किंमती वाढूं लागतील.

**नोटा चालू असल्यापासून साक्षात् फायदा:-** पतीचा उपयोगकेल्यापासून आणखी एक फायदा होत असतो; तो वर सांगितला नाहीं. कोणत्याहीदेशांतील नोटा म्हणजे केवळ पैशाचा मोबदला आहे असें मागेंच दर्शविलें आहे. जर ब्यांकेच्या नोटा हुंड्या वगैरे साधनें हीं जर उपयोगांत आणलीं नाहींत, तर पुष्कळ सोन्या रुप्याचे नाण्यांची जरूर पडेल. म्हणून या पतीच्या साधनांचा उपयोग केल्यापासून साक्षात् फायदा आहे. कारण किंमतहीन कागदाचा सोन्यारुप्यासारख्या बहुमोल किंमतीच्या पदार्थांच्या मोबदला उपयोग करितां येतो. इंग्लंडांतील हजार रुपये किमतीची नोट ज्या पदार्थांची करितात त्या पदा-

र्थाची किंमत एक पैसुद्धां होत नाहीं. यावरून त्या पदार्थाचें अंगमोल अतिशयच थोडें आहे. किंवा अगदींच नाहीं हें खरें आहे. परंतु पतीच्या योगानें त्याच्या अंगीं विक्रय पावण्याची जी योग्यता येते; तिच्या योगानें ती नोट ज्या मनुष्याजवळ असते, त्याला हजार रुपये जितके उपयोगीं पडतात, तितकीच ती नोट उपयोगीं पडते, हें आतां आबालवृद्धांसही ठाऊक झालें आहे.

---

# किरकोळ प्रकरण.

## भाग १ ला.

### संपत्तीचा व्यय.

**संपत्तीचा व्यय म्हणजे काय व तो केव्हां करावा:**—संपत्तीच्या उपयोगाची जी हानि तीसच तिचा व्यय म्हणतात. जसें कोळसे जाळून टाकणें, भाकरी खाऊन टाकणें, वाद्य वाजवून वाजवून पुन्हा उपयोगी न पडे असें करणें, इत्यादि संपत्तीच्या व्ययाचे प्रकार आहेत. यावरून वस्तूंचा उपयोग निरनिराळ्या प्रकारांनीं नाहींसा होतो. उदाहरण अन्न कांहीं दिवस ठेविलें, तर तें नासून जातें. पंचांग ज्या सालचें असतें तें साल संपतांच तें निरुपयोगीं होतें. गलबतें वापरून बिघडतात. घराची दुरुस्ती केली नाहीं, तर तीं निरुपयोगीं होतात. त्या प्रमाणें कांहीं वस्तु लवकर निरुपयोगीं होतात. व काहीं वस्तु कालांतरानें निरुपयोगीं होतात. शिजविलेलें अन्न व पक्क फळें पहिल्या प्रकारचीं उदाहरणें आ-

हेत, आणि घर गलबतें वगैरे दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें आहेत. ह्या वरून हें उघड आहे कीं, वस्तु जेव्हां उपयोग करण्यास लायक असतात, तेव्हां त्यांचा उपयोग करावा. म्हणजे शिजविलेलें अन्न असलें, तर तें पंधरा दिवसांनीं खाऊं म्हणून तें ठेवतां कामा नये. कारण तें नासून जातें. म्हणून लागलेंच खाल्लें पाहिजे. नासल्यावर त्याचा पुढें कांहीं उपयोग होणार नाहीं. सुदैवानें आपल्या जवळ ज्या वस्तु असतील, त्यांचा अत्यंत उपयोग करून घ्यावा. अत्यंत उपयोग करून घेणें म्हणजे, एकाद्या पदार्थ नासण्यापूर्वीं, किंवा बिघडण्यापूर्वीं जितके वेळां त्याचा उपयोग करितां येईल, तितके वेळां करून घेणें ह्यासच वस्तूचा अत्यंत उपयोग म्हणतात. उदाहरण एकादें पुस्तक एकदा वाचून फाटलें, किंवा बिघडलें, तर त्याचा अत्यंतउपयोग झाला असें होत नाहीं. तर तें फाटण्यापूर्वीं जितके वेळां व जितक्या जास्त लोकांकडून वाचलें जाईल, तितके वेळां व तितक्या लोक्यांस त्या पुस्तकाचा अधिक उपयोग झाला असें म्हणतां येईल. या कारणावरून तें पुस्तक अत्यंत उपयोगीं म्हणावें. व असा उपयोग होतो तेव्हां उपयुक्ततेची वृद्धि झाली असें होतें. सार्वजनिक लायब्ररया, सर्व संग्रहालयें, उद्योगशाळा, धर्मशाळा इत्यादि उपयुक्ततेची वृद्धि दर्शविणारीं उदाहरणें आहेत. ह्यांस जरी खर्च पडतो तरी त्यांच्या उपयुक्तते पुढें तो खर्च कांहींच नाहीं.

अन्नाप्रमाणें कोणताही एकादामाल एक वेळ उपयोगानें जर नाहींसा झाला, तर ज्यानें त्याचा उपभोग घेतला, त्या व्यक्तीपुरता मात्र त्याचा उपयोग झाला, सार्वजनिक उपयोग झाला असें होत नाहीं, ह्याच प्रमाणें प्रत्येक वस्तूचा उपयोग होऊं लागेल, तर त्यापासून उपयोगाची वृद्धि होत नाहीं. यावरून आपला हेतु असा असावा, कीं जेव्हां वस्तु अत्यंत उपयोगीं असेल, तेव्हांच तिचा व्यय करावा, हें व्यक्त होण्यासाठीं आपण एक उदाहरण घेऊन पाहूं. एका मनुष्याजवळ थोडें अन्न आहे, व तो वाट चुकून जंगलांत गेला आहे, असें मानिल्यास जर त्यानें आपल्याजवळ असलेलें अन्न पहिल्याच भुकेला एकदम खाऊन टाकिलें, तर त्याचें हें करणें मोठ्या चुकीचें होईल. कारण त्या-

स पुढें बरेचदिवसपर्यंत उपाशीं मरण्याचा प्रसंग येईल. ह्याकरितां अशा प्रसंगीं त्यानें केवळ प्राण रक्षण करण्यापुरता मात्र त्या अन्नाचा थोडा अंश रोज खावा. हीच गोष्ट प्रपंचांत आपण जो संग्रह करितों; त्यासही लागू आहे तारुण्यांत चैनीचे पदार्थ घेण्यांत जो पैसा आपण खर्च करितों, तो खर्च केला नाहीं, तर त्याचा वृद्धावस्थेंत आपणास चांगला उपयोग होईल. कारण त्या वेळेस निर्वाहास लागणाऱ्या सामान्यवस्तुसुद्धां मिळणें कठीण असतें. ह्यावरून सर्व संपत्तिही उपयोगार्थ उत्पन्न केली आहे. परंतु तिचा जेव्हां अत्यंत उपयोग होईल. तेव्हांच तिचा व्यय करावा, असें तत्व निघतें.

**व्ययाविषयीं लोकांची गैर समजूतः—** व्यापारवृद्धिकरितां सढळ हातानें पैसा खर्च करावा, असें वेळोवेळीं लोक प्रतिपादन करीत असतात. पैसा खर्च न करितां प्रत्येक मनुष्य संचय करूं लागेल, तर त्यापासून व्यापाराची वृद्धि होणार नाहीं; परंतु होणारा व्यय हा उत्पादक आहे किंवा अनुत्पादक आहे, याचा विचार खर्च करणाऱ्यानीं केला पाहिजे. उभयविध व्ययापासून होणाऱ्या कार्याचें विवेचन करितों:

**उत्पादक खर्चानें संपत्ति वाढते व अनुत्पादक खर्चानें संपत्ति उणी होतेः—** पहा कोणी एक मनुष्य फार उधळ्या निघाला. त्यानें आपलें अवघें उत्पन्न व भांडवल हीं उधळून टाकिलीं. परंतु असा खर्च उत्पादक मजुरांचा संभाळ करावयास्तव झाला असला, तर असें होईल कीं, तो खर्च करणारा गृहस्थ बिचारा बुडाला. पण त्यापासून देशाचें कांहीं अनहित झालें नाहीं. कोणी एकानें उत्पादक मजुरांचा संभाळ करून, त्यापासून आपल्यास नफा व्हावा अशा बुद्धीनें आपली पुंजी वहिवाटिली, अथवा त्या उत्पादकमजुरानीं केलेले जे सुखकारकपदार्थ ते आपल्या उपभोगाकरितां विकत घ्यावयास आपली पुंजी खर्चिली, तरी फळ सारखेंच. जर अनुत्पादक मजुरांचा सांभाळ करावयास पैका खर्च झाला असला, आणि त्याबद्दल कांहीं सांगायासारखें हातीं आलें नसलें; तर ती गोष्ट भिन्न आहे. जर तो पैसा व्यापारी, कारागीर अशा लोकांत खर्चून चांगलें सुंदर घर

सामानानें भरलेलें डौलदार गाड्या, घोडे, सेवेंत अनेक चाकर मोठमोठ्या मेजवान्या अशी ख्यालीखुशाली करून घेतली असली, तर असें होतें कीं, दुसरे अधिक पदार्थ उत्पन्न करण्याकरितां व्यापारी कारागीर लोकांस सोय पडावी, म्हणून त्या उधळ्या मनुष्यानें आपली पुंजी त्या लोकांकडे जशी काय सोंपवूनच दिली. असें झालें असलें तर त्या उधळ्या मनुष्यानें कांहीं वाईट केलें नाहीं. त्यानें आपल्याजवळचा पैसा देऊन तितक्या किंमतीचे पदार्थ नाना प्रकारचे घेतले, ही एक त्यानें नवी संपत्ति मिळविली. परंतु तो संपत्तीचा उपयोग कसा करितो हें पाहिलें पाहिजे. आपल्या इच्छा तृप्त करणें, आपल्या इष्टमित्रांस मेजवान्या करणें, गाडी घोडे वापरणें, उंच वस्त्रें नेसणें, चाकरांसही चांगलें शोभविणें अशा व्यवहारांत त्या पुंजीची किंवा भांडवलाची योजना झाल्यास, असें होतें कीं व्यापारी इत्यादि लोकांस जो पैका देऊन, त्यांजपासून नाना प्रकारचे उपभोग्य पदार्थ घेतले, त्या पैक्याचा योग्य खर्च न होतां, उपभोग्य पदार्थांचा मेजवान्या, डौल दिमाखवारवालीं फडशा उडाला, म्हणून अशी जी पुंजी त्या उधळ्या मनुष्यानें उडविली, तीस तोव लोकही आंचवले. सारांश पुंजीचा केवळ उपभोगाकरितां जो खर्च, तोच खर्च झाला. दुसरे जिन्नस उत्पन्न करावयास पुंजीचा जो खर्च तो म्हणायास मात्र खर्च झाला असें होतें.

आतां कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं, जर लोक ख्याली खुशालीचे जिन्नस विकत न घेतील, तर त्या कारागीर लोकांनीं त्या जिनसांस काय करावें. लोकांत जिनसांचा खप पाहून यांत आपल्यास चार पैसे मिळतील, अशा आशेनें कसबी लोक ते जिन्नस उत्पन्न करितात. नानाप्रकारचे खेळाचे जिन्नस, मिठाई, तसेच दुसरे मौजेचे पदार्थ शहरांतील दुकानांत बहुतकरून यावेंत असतात, ते, व नाच, तमाशे, दुर्व्यसनें इत्यादिकांचा खप लोकांत कमी झाल्यास, त्यांवर उपजीविका करणाऱ्यांचे कसबांत कमतरता होईल. परंतु त्यापासून लोकांचें कांहीं अनहित होणार नाहीं. भांडवलाचा खर्च होतो तेव्हांच त्यापासून उत्पन्न होतें, परंतु जे उद्योगी आहेत, अशाचे ठायीं त्या भांडवलाचा खर्च झाला पाहिजे, त्यापासून चांगले मूल्यवान् उत्पन्न हो-

तें, आणि त्या योगानें दुसरे जिन्नस घेतां येतात; तेंच मूल्यवान् उत्पन्न कारागीर कसबी अशांत वांटलें जातें, तेणेंकरून त्यांस आपआपले धंदे करावयास उमेद येते. मातबर लोक उधळेपणा न करितां जें कांहीं संग्रहीं ठेवितात, तेणेंकरून मजूरलोकांचें हित होतें. परंतु लोक असें म्हणतात कीं, जो कोणी मनाचा उदार, हाताचा सढळ असतो, त्याचे ढसाळखर्चानें जरी त्याचें अनहित होतें, तरी त्याचे हातून बहुतेकांचा सांभाळ होतो, असें म्हणणें केवळ भ्रमात्मक होय.

जर लोक ऐषआरामीखालीं संपत्ति उधळूं लागले. तर मग मजूरदारांचा कसा बचाव होईल. उद्योग करणारांस धंदा मिळणार नाहीं; यामुळें त्यांचा निर्वाह चालणें फार कठीण होईल. सर्व संपत्तीचा खर्च उधळे लोकांकडे होऊं लागला, मेहनत करणारे उपाशी मरूं लागले, अशी ज्या देशाची स्थिति असते, तेथें संपत्तीचा आणि लोकांचा भरणा नाहींसा होऊन जातो, असें सांगावयास नको. लोक उधळेपणानें खर्च करितात, तो बंद करण्याविषयीं सरकारानें कायदे केले होते. परंतु त्यापासून कांहीं चांगलें निष्पन्न झालें नाहीं यास्तव भांडवलाचा जसा स्वभावें करून ओघ चालेल तसा चालूं देणें यांतच हिताची गोष्ट आहे. भांडवलाची कशी वहिवाट करावी, हें ज्याचें त्यास उत्तम रीतीनें सुचतें. आणि ज्याचें भांडवल असतें, त्याला जशी त्याविषयीं काळजी असतें, तशी दुसऱ्या कोणास असणार नाहीं. परंतु भांडवलवाला आपल्याच स्वार्थाची युक्ति काढील; मजूर लोकांचें हीत होईल अशा रीतीनें भांडवलाची वहिवाट होण्याची युक्ति काढणार नाहीं. सारांश मातबर लोकांनीं कांहीं भांडवल संचय करून ठेविलें पाहिजे; परंतु संचय करण्यास कांहीं मर्यादा असावी. खर्च न केला तर आपलें वांचणेंच होणार नाहीं. या संसारांत जीवानें खावें, प्यावें. सुख संतोष भोगावा, दुसऱ्यावर दया करावी, यासाठीं संपत्ति केली आहे. त्यानें अन्नवस्त्रादिकांची ददात न काढितां चांगला मोकळ्या हातानें खर्च केला असतां त्यास शब्द लावूंनये. निरर्थक खर्च करणें यांत जशी मनुष्याची संपत्ति कमी होते, तशीच देशाची संप-

कमी होते. ज्या खर्चापासून कांहीं लाभ होत नाहीं, तो खर्च जरी खर्च करणाऱ्यास मोठा आनंदकारक असला, तरी तेणेंकरून लोकगरीब होतील. कारण लोकांचा निर्वाह होण्याचें जें सांठवण त्यांतून त्या खर्चानें उणें झालें. एकेक मनुष्यानें केलेला जो संचय तो सर्व मिळून देशाचें भांडवल होतें. ज्या मनुष्यास जितकें उत्पन्न असतें तितकें तो सर्व खर्चूं लागला, तर काळेंकरून देशाची अवघी संपत्ति नाहींशी होऊन, जिकडे तिकडे विपत्ति दृष्टीस पडूं लागेल.

तसेंच जर हरएक मनुष्य अन्नपाण्याशीं गांठ पडाया पुरताच खर्च करूं लागला, तरीं जिकडे तिकडे विपत्ति दृष्टीस पडूं लागेल; या प्रकारें पाहतां खर्चाच्या शेवटच्या दोन मर्यादा दिसतात. **एक दंदात काढणें, म्हणजे कृपणपणानें वागणें, आणि एक उधळेपणा करणें.** या दोन्ही रीति वाईट आहेत. लोकांत चांगल्या स्थितीनें वागणें, व परोपकारादिक करणें, हें कृपणाचे हातून अगदींच घडत नाहीं. उधळेपणा करणारा तर गोरगरीबांचा निर्वाह होऊन काम धंदा चालविण्यास साधनीभूत जें अन्न वस्त्रादिकांचें सांठवण, तेंच नाहींसें करून टाकितो.

**कोणताही व्यय अयोग्य. अशाविषयीं कांहीं लोकांची गैरसमजूतः—** कांहीं लोकांच्या मतानें सर्व प्रकारचा व्यय हा नुकसानकारक आहे. त्यांना असें वाटतें कीं, पैसा हा व्याजानें वाढवा, किंवा त्याचें सुवर्ण घेऊन तें गांठीस घालून ठेवावें. अशा लोकांना संचयाचा इतका छंद असतो, कीं, ते सामान्यतः अन्नवस्त्रादि घेण्याकरितां पैसा खर्च करण्याविषयीं काचकुच करीत असतात. असे लोक असल्यानें देशाचें अहित होत नसून उलटे ते देशाची संपत्ति वाढविण्यास कारणीभूत होतात. पहाकीं, त्यांनीं आपण पैशाचा व्यय न करितां व्याजी लाविला, अशी कल्पना करूं, तर त्यांनीं ज्या पेढीवाल्यांकडे पैसा दिला, ते पेढीवाले तऱ्हतऱ्हेचे कारखाने काढण्यास त्या योगानें समर्थ होतील, व त्या योगानें देशाची संपत्ति वाढेल. कित्येक लोक मेजवान्या, बैठका, तमाशे नाटकें वगैरे करविण्याकडे पैसा फार खर्च करितात. तेणेंकरून त्यांच्या चैनीक-

रितां लागणारे पदार्थ उत्पन्न करणाऱ्या धंदेवाल्यास उत्तेजन मिळ-तें त्यावरून केवळ आपल्याजवळ द्रव्याचा संचय मोठा व्हावा. ह्या हेतूनें सर्व प्रकारच्या उपभोगाचा त्याग करणें हें उपयोगाचें नाहीं. ज्यापासून आपणांस सुखोपभोग होत नाहीं. त्यास आपण संपत्ति म्हणत नाहीं त्यावरून आपल्यास व आपल्या इष्टमित्रांस जेणेंकरून सुख उत्पन्न होईल, तिकडे संपत्तीचा व्यय करावा.

---

# भाग २रा.

## सरकारचीं कर्तव्यें.

**सरकारः**— समाजाच्या मालमत्तेचें व शरीराचें संरक्षण होण्यास मुख्य साधन म्हटलें म्हणजे सरकार ( राज्यव्यवस्था ) हें होय. त्या साधनाचे अभावीं समाजास सौख्य कधींहीं प्राप्त होणार नाहीं. यावरून सरकार जेंजें कर्तव्य बजावितें, तेंतें प्रजेच्या हिताचें असलें पाहिजे. सरकारचीं कर्तव्यें दोन प्रकारचीं आहेत.

**१ अवश्य कर्तव्य. २ ऐच्छिककर्तव्य.**

**अवश्य कर्तव्यः**— सरकारचें अवश्य कर्तव्य हें आहे कीं, रयतेचें संरक्षण करावें, म्हणजे रयतेमध्यें कोणी कोणावर जुलूम करूं नये, व कोणी कोणाशीं कपट करूं नये, असा बंदोबस्त ठेवावा. असा बंदोबस्त ठेवण्यासाठींच सरकार समुद्रावर मोठमोठीं आरमारें व जमिनीवर फौजा ठेवितें. आणि त्यांच्या हातून परचक्र, चांचे-लोक, लुटारू व बंडवाले ह्यांचा बंदोबस्त करितें. चोर, चहाड, भामटे, उचले वगैरे लोकांस पकडून शिक्षा करण्याकरितां चौकीदार, हवालदार, नायबफौजदार, फौजदार असे अधिकारी नेमितें. लोकांच्या देण्याघेण्याच्या खटल्यांच्या चौकशीकरितां, अमीन, सदरअमीन, जज्ज व-

गैरे अधिकारी नेमितें. कैदीलोकांस ठेवण्याकरितां तुरुंग बांधितें. सारांश रयतेच्या सुखाकरितां आणि बंदोबस्ताकरितां जें जें आवश्यक आहे, तें तें करितें.

**ऐच्छिक-कर्तव्यः**— देशांत रस्ते तयार करावे, आगगाड्या सुरू कराव्या; सर्व प्रजाजनांची मानसिक व नीतिसंबंधीं सुधारणा होण्यासाठीं राष्ट्रीयशिक्षणाची तजवीज करावी. देशांतील वजनी व कैली मापें सर्व ठिकाणीं सारखीं करण्याची तजवीज करावी. पोस्टखातें व दवाखानें स्थापन करावे. एकंदरींत हीं ऐच्छिक-कर्तव्यें असंख्य आहेत. यामुळें प्रजेच्या हिताच्या कामाची परिसमाप्ति कधींही होणार नाहीं, हें उघड आहे.

**राज्यव्यवस्था नसल्यानें होणाऱ्या दुःस्थितीचीं उदाहरणेंः**— यहुदी लोकांविषयीं एक चमत्कारीक गोष्ट लिहिली आहे. ते आपल्या शहराला तट बांधीत असतां, त्यांजवर शत्रूनीं अशी गर्दी करावी कीं, त्यांस सर्वकाळ हत्यारबंद होऊन सावध रहावें लागत असे. शत्रु कोणत्या वेळेस चालून येऊन अकस्मात् हल्ला करील कोण जाणें अशा भीतीनें सर्व लोक एका हातानें तटबंदीचें काम करीत; आणि दुसऱ्या हातानें हत्यार धरीत. अशा रीतीनें एका माणसाचें काम करण्यास दोन माणसें लागलीं, हें स्पष्टच आहे. परंतु त्यांनीं शत्रूचें निवारण करण्यासाठीं ही अडचण पतकरिली.

आशीया खंडांतील किती-एक देशांची स्थिति अद्यापि अशीच आहे. त्यांत लुटारू लोक लुटण्याच्या हेतूनें चोहोंकडे नेहमीं फिरत असतात. त्यांची भीति लोकांस अशी असते कीं, हत्यारबंद असून सावध असल्याखेरीज आपला बचाव होईल असा भरवसाच नसतो. तिकडे फिरलेले लोक असें सांगतात, कीं शेतकरी जमिनींत बीं पेरण्यास निघाला म्हणजे आपलें बीं कोणी लुटून नेऊं नये म्हणून तो आपणाबरोबर एक असामी हत्यारबंद घेतो. त्यामुळें असल्या ठिकाणीं जमिनीची लागवड करणें म्हणजे मोठ्या प्रयासाचें व खर्चाचें काम आहे. कारण एका असामीच्या कामाला दोन असामी लागतात म्ह-

णजे एक असामी पेरण्याला आणि दुसरा असामी एकादा शत्रू आला असतां, त्या बरोबर लढण्याला. त्या देशांतलें उत्पन्नही दोन असामी मेहनत करणारे असल्यामुळें अर्थात दोघांस अर्धें अर्धें मिळतें. जर लुटीचें भय नसतें, तर सगळें उत्पन्न एकासच मिळतें. इतकें करूनही लोकांच्या मालमत्तेचें रक्षण म्हटलें म्हणजे सरासरीच होतें. कारण एरवाद्या वेळेस असें होतें कीं; लुटारू लोकांच्या मोठमोठ्या टोळ्या येऊन मालकास हाणमार करून, त्याची सर्व मालमत्ता लुटून नेतात. अशी स्थिति असल्यामुळें, त्या देशांत अगदीं थोड्याशा जमिनीची लागवड होऊन, बाकीची पड राहते. लोकवस्ती म्हटली तर ज्या प्रदेशाचे उत्पन्नावर वीस लाख देखील लोकांचा निर्वाह होण्यासारखा आहे, त्या प्रदेशांत एक लाख देखील लोक नसतात; इतकी कमी असते. व त्यास देखील अन्न असलें तर वस्त्र नसतें, आणि वस्त्र असलें तर अन्न नसतें; असें त्याला दारिद्र्य असतें; हें सर्व मालमत्तेचें संरक्षण बरोबर होत नसल्यामुळें होतें. ज्या देशांतले लोक रानटी असतात, त्या देशांतली स्थिति अशीच असते. तेथें माणसाचा बहुतेक काळ आपलें रक्षण कसें करावें ह्या काळजींत आणि रक्षणाच्या तजविजी करण्यांत जातो. त्यांजबरोबर लढण्याची त्यास हिंमत असते. त्यांजबरोबर लढण्यासाठीं तो हत्यारें जमवितो आणि जे त्यास भारी असतील त्यांच्या हातीं न लागावें म्हणून लपून राहण्यास जागा पहातो. न्यूजीलंद नांवाच्या बेटांत कित्येक लोकांनीं एकत्र जमून एकाद्या उंच टेंकडीवर खोपटी बांधावी, आणि शेजारच्या लोकांनीं आपणावर चालून येऊनये म्हणून टेंकडी सभोंवती खंदक खणून मेढी पुराव्या असा बंदोबस्त करावा लागतो. इतका बंदोबस्त केला असतांही त्यांजवर कैकवेळां अकस्मात् घाले पडतात. अशा देशांत लोकसंख्येच्या मानानें आणि दुसऱ्या देशाच्या तुलनेनें पाहिलें असतां दरसाल शेंकडीपट लोक अधिक मारिले जातात. कारण त्यांत दंगे धोपे फार होतात. तेथले लोक गरीबच असतात. ह्यामुळें मालमत्ता फार थोडी असते, तेव्हां अर्थातच माणसें मारलीं जातात. त्या प्रमाणें मालमत्तेचा नाश होत नाहीं. त्यांचा अर्धाअधिक काळ आपल्या रक्षणाचे उपाय करण्यांत जातो.

आणि इतका काळ जाऊनही रक्षण चांगलें होत नाहीं. त्यामुळे आपल्या श्रमाच्या फळाचा उपयोग आपणास घडेलच असा भरंवसा त्यांस तिल-मायः नसतो; तेव्हां मालमत्ता त्यांजपाशीं जमावयाचा विशेष संभव न-सतो.

अशी दुर्दशा होण्याचें मुख्य कारण सामाजिकसौख्याचें जें मुख्य साधन सरकार तें त्या लोकांनीं स्थापन केलें नाहीं, यामुळे बळी तो का-न पिळी असें झालें. सरकारची स्थापना झाल्यानें, प्रजा संरक्षणा सा-ठीं फौजफांटा आरमारें व कोर्टें यांची योजना होते. यामुळें सर्वांच्या मालमत्तेचें व शरीराचें संरक्षण अबाधितपणें होतें.

ह्या साधनांचा खर्च प्रजाजनांनीं देणें आवश्यक आहेः—फौ-जफांटा, आरमारें, कोर्टें वगैरे गोष्टींबद्दलचा खर्च सरकारास रयतेपासू-न मिळतो आणि रयतेच्या कल्याणासाठीं ह्या गोष्टी होतात म्हणून त्यां-चा खर्च रयतेनें द्यावा हें रास्तच आहे. रयत लोक अनेक प्रकारचें सर-कार देणें देतात, तें सरकार आपलें पालन वगैरे करितें म्हणूनच देतात. मागें लिहिल्याप्रमाणें आशिया खंडांतच कितीएक देशांमध्यें लोक शेतें पेर-तेवेळीं आपणाबरोबर हत्यारबंद असामी घेऊन जाऊन त्यास आपल्या शेताच्या उत्पन्नाचा कांहीं हिस्सा ज्या प्रमाणें देतात, त्या प्रमाणें हें सरकार देणें देतात.

**सरकार देण्याविषयीं कांहीं लोकांची गैर समजूतः**— कितीएक-लोकांस ही गोष्ट समजत नाहीं; त्यांस वाटतें कीं, सरकार देण्याचा ख-र्च हा इतर खर्चाप्रमाणें नव्हे, तर अगदीं व्यर्थ आहे. जे सरकार देणें दे-तात त्यांस ह्याबद्दल कितीएक गोष्टी मिळतात, हें त्यांच्या ध्यानांत मुळीं-च येत नाहीं. परंतु वास्तविक विचार करून पाहतां, एक पदार्थ देऊन त्या-च्या मोबदला दुसऱ्या किती-एक गोष्टी घ्याव्या हें होय. सर्व लोक दा-णा तेल तूप वगैरे ह्यां बद्दल भुसारी व वाणी ह्यांस पैसा देतात, आ-णि कापडाबद्दल कापडकऱ्यास पैसा देतात. तसाच आपणांस कोणी लुटूं नये मारूं नये फसवूं नये म्हणून सरकार बंदोबस्त करितें त्याब-

---

* न्यूजीलंडाची गोष्ट अलीकडे बदलून पुष्कळ बंदोबस्त तेथें झाला आहे.

बद्दल त्यास देतात. हा बंदोबस्त सरकाराकडून नसला, तर लोकांस निम्मे काळ अन्नाच्छादन मिळविण्याकडे, आणि निम्मे काळ अन्नाच्छादनाच्या संरक्षणाकडे, अथवा त्याचें रक्षण करण्याकरितां ठेविलेल्या मनुष्याचे अन्नवस्त्राची तजवीज करण्याकडे घालवावा लागेल. सरकार देण्यापेक्षां हें देणें फार पडेल, व त्यास मेहनतही फार पडेल. इतकें पडूनही लोकांचें संरक्षण कितपत होईल; हें मागें रानटी लोकांचें उदाहरण लिहिलें आहे, त्यावरून स्पष्टच आहे. देशांमध्यें मुळींच सरकार नसण्यापेक्षां कसेंही वाईट सरकार असलें, तरी तें फार बरें आणि मागील लेखावरून लक्षांत येईल कीं, सरकारास बंदोबस्त करण्याबद्दल जें देणें तें शिपायास चाकरीबद्दल पगार द्यावा, अथवा व्यापाऱ्यापासून एकादा जिन्नस घेऊन, त्यास त्याची किंमत द्यावी ह्या प्रमाणेंच होय.

सरकार देणें व इतर देणें यांमधील भेदः— दुसऱ्या देण्यामध्यें आणि सरकार देण्यामध्यें हा मोठा भेद आहे कीं; दुसरें देणें मनुष्याच्या खुशीवर आहे. आणि सरकार देणें हें मनुष्यास नामाम आहे, म्हणजे मनुष्यानें आंगरखा शिंप्याकडे न टाकितां तो घरींच शिवला, अथवा मुळींच अंगरख्या वांचून निर्वाह केला, तर त्यास शिंप्याला दाम द्यावा लागणार नाहीं. दुसऱ्यांही बहुतेक सर्व गोष्टींचें असेंच आहे. आणि असें करण्यास तो मुखत्यार आहे. परंतु सरकारास देणें हें मनुष्याच्या खुशीवर नाहीं तें दिलेंच पाहिजे; एखादा मनुष्य जर म्हणेल कीं; माझ्या शरीराचें व मालमत्तेचें संरक्षण मीच करीन, फौज फांटा, आरमार, न्यायाधीश, वगैरे ह्यांपासून जो बंदोबस्त होतो, त्याची मला गरज नाहीं, व त्याबद्दल मी सरकास कांहीं देणार नाहीं; तर त्यास उत्तर हेंच कीं; तूं येथून निघून जाऊन एकाद्या अरण्यांत किंवा जेथें राजरक्षण नाहीं अशा एकाद्या देशांत रहा. आणि मग पाहिजे तसें कर, परंतु येथें स्वतेस राजाचें रक्षण आहेच. ह्यास्तव तूं येथें आहेस तोंपर्यंत राजापासून आपलें रक्षण व्हावें अशी इच्छा तुला असो अगर नसो, पण तुझें रक्षण होतेंच, आणि त्याबद्दल तुला सरकार देणेंही दिलेंच पाहिजे. समुद्रावर आरमारें ठेवून ह्या देशावर परचक्र येवूं नये.

म्हणून जो बंदोबस्त केला आहे, त्यापासून इतर लोकांचें संरक्षण हो- तें, तसेंच तुझेंही होतें. कायदा कानू व फौजदार वगैरे अधिकारी त्यां- च्या योगानें चोर, मारेकरी वगैरे लोकांपासून येथील इतर लोकांचें सं- रक्षण होतें; तसें तुझेंही संरक्षण होतें. कायदा वगैरे नसतें तर चोरांनीं सर्वांस नासून सोडिलें असतें. तूं ह्या देशांत आहेस तोंपर्यंत तुझेंच सं- रक्षण करण्याची इच्छा ह्या सरकारास असो अगर नसो; तरी त्याकडू- न तें होतेंच. तसेंच ह्या सरकारास बंदोबस्ताबद्दल खर्च देण्याची इच्छा तुला असो; अगर नसो पण तो तुजपासून घ्यावा हें रास्त आहे. आ- तां हें आपणास पतकरतच नाहीं असें तुला वेडेपणानें वाटत असलें तर तूं हा देश सोडून जाऊन एकाद्या अरण्यांत रहा म्हणजे तेथें तु- ला सरकार देणें द्यावें लागणार नाहीं.

ह्यावरून समजावें कीं; **जोंपर्यंत कोणी मनुष्य एकाद्या देशांत राहतो, तोंपर्यंत त्यानें तेथल्या सरकारास वश हो- ऊन रहावें, व त्या सरकारचें देणें द्यावें हें रास्तच आहे.** आ- तां प्रत्येकानें किती द्यावें हें सरकार ठरवितें. सरकार देणें हें इतरम- नुष्यांपासून चाकरी वगैरे घेऊन त्यांस वेतन देण्याप्रमाणेंच आहे. अ- सें मागें लिहिलें आहे. परंतु त्यांत एक मोठा भेद आहे, तो हा कीं; को- णा मनुष्यास एकादा चाकर ठेवावयाचा असल्यास, तो त्या चाकरा- शीं बोली करितो. आणि त्या बोलींत त्याचें जमलें तर त्यास ठेवितो ना- हीं तर दुसऱ्यास ठेवितो. परंतु सरकारची गोष्ट निराळी आहे. सरकार रा- जा असो अगर राणी असो, हल्लीं गव्हरनर आहेत असें असो, किं- वा पार्लमेंटासारखी मंडळी असो; तरी सरकार म्हटलें म्हणजे त्यास स- र्व रयतेवर हुकूम करण्याचा व तो बजाविण्याचा अखत्यार असला पाहि- जे, नाहीं तर रयतेचें संरक्षण त्याचे हातून होणारच नाहीं. ह्याकरितांच आपल्या संरक्षणाबद्दल सरकारास काय द्यावें हें ठरविण्याचें दरएक म- नुष्याच्या इच्छेवर नाहीं. तर तें सरकारच ठरवितें आणि रयतेपासून घे- तें.

**प्रजेकडून घेतलेल्या पैशा संबंधानें सरकारचें कर्त- व्यः**– देशाच्या रक्षणास जितकें द्रव्य अवश्य लागतें त्यापेक्षां अ-

धिक सरकारानें रयतेपासून घेऊंनये, व रयतेपासून घेतलेल्या द्रव्याचा उधळेपणानें रिकामा खर्च सरकारानें करूंनये ह्याचा बंदोबस्त करणें, हें रास्त आहे.

प्रजाजनांचें कर्तव्यः– सरकारच्या अमलांत राहिल्यानें आपलें संरक्षण होऊन सर्व प्रकारें हित होतें त्याबद्दल लोकांनीं त्या सरकारचे उपकार मानावे. ते कित्येक लोक मानीत नाहींत. कारण जेथें सरकारनाहीं तेथल्या लोकांचे हाल किती होतात व ते विपत्ती किती भोगीत असतात, हें त्यांस समजत नाहीं. व ते कधीं ह्याचा विचारही करीत नाहींत. मनुष्यें द्रव्य देऊन अनेक पदार्थ विकत घेतात. त्यापेक्षां राजरक्षणाची योग्यता पाहिली असतां तें मनुष्यास फार स्वस्त पडतें. मनुष्यें आपापलें रक्षण करूं लागलीं, तर त्यांस अतोनात खर्च पडूनही तसें रक्षण होणार नाहीं. कोष्ट्यापासून कापड व कासारापासून भांडीं हीं विकत न घेतां आपणाकरितां मनुष्यें आपणच तयार करूं लागलीं तर हल्लींच्या पेक्षां तीं फारच वाईट होतील. आणि खर्च व मेहनत हीं जास्त पडतील, तरी त्यांजपासून निर्वाह होईल; परंतु **आपल्या शरीराचें व मालमत्तेचें संरक्षण मनुष्यें स्वतः आपणच करूं लागलीं असतां, त्यांस अतिशयित भार पडूनही संरक्षण होणार नाहीं, आणि त्यांस खर्च पराकाष्टेचा पडेल.**

---

## भाग ३ रा.

## सरकार देणें.

**सरकारास कर्तव्य बजाविण्यास द्रव्याची आवश्यकताः–** प्रजेच्या हिताकरितां सरकारास अनेकविध कामें करावीं लागतात. परंतु तीं कामें द्रव्यावांचून होणें शक्य नसतें. या करितां सरकारास प्रजेच्या संरक्षण संबंधीं कर्तव्यें बजावितां यावीं. म्हणून प्रत्येक प्रजाजनास

द्रव्याची मदत करणें भाग आहे. यावरून सरकारानें प्रजाजनावर कर अवश्य बसविला पाहिजे. म्हणजे तेणेंकरून सरकारचें द्रव्यबळ वाढून, पाहिजे तीं प्रजाहिताचीं कर्तव्यें बजाविण्यास सरकार समर्थ होतें.

**करः**– स्थानिक किंवा सर्व राज्यव्यवस्थेच्या खर्चासाठीं व्यक्तिमात्रास जें सरकार देणें भाग पडतें, त्यासच कर म्हणतात. कराचे दोन प्रकार आहेत.

**१ प्रत्यक्ष कर. २ अप्रत्यक्ष कर.**

**प्रत्यक्ष करः**– जमीन वापरण्यासाठीं जो सारा आपण सरकारास देतों, त्यास प्रत्यक्ष कर म्हणतात. घरपट्टी लोकलफंड वगैरे या प्रकारांत मोडतात.

**अप्रत्यक्ष करः**– व्यापार संबंधीं मालावर जो कर घेतात, तो या सदरांत येतो. कारण जरी सर्व व्यापारी लोकांवर हा कर बसतो, तरी त्याचा बोजा गिऱ्हाइकांवर पडतो. कारण ते आपल्या मालावर तितकें मोल अधिक चढवितात, ती किंमत त्यांस द्यावी लागते. दारू वगैरे मादकपदार्थ, पान, तंबाकू, मीठ वगैरे वरील कर या सदरांत येतो. कराविषयीं अडामस्मिथ यांणीं ठरविलेले सिद्धांत खालीं देतोंः–

**पहिला सिद्धांतः**– प्रत्येक प्रजाजनानें आपल्या मिळकतीनुरूप सरकारास राज्यकारभाराचे कामीं मदत होण्याकरितां, सरकार देणें दिलें पाहिजे, कारण आपण मिळविलेल्या मालेचा उपभोग सरकारच्या आश्रयानें त्यास निर्भयपणें करितां येतो.

**दुसरा सिद्धांतः**– केव्हां किती कर द्यावा हें ठरलेलें असावें. नाहींपेक्षां या कामीं वसूल करणाऱ्या कामदाराकडून प्रजेवर जुलूम होण्याचा संभव आहे.

**तिसरा सिद्धांतः**– ज्या वेळेस प्रजेला कर देणें सोईचें असतें, अशा वेळीं तो घेण्याची व्यवस्था असावी. पाहिजे त्यावेळीं कर वसूल करणें गैरसोईचें होईल.

**चवथा सिद्धांतः**– प्रजेकडून वसूल झालेली रकम शक्य तितकी सरकारचे पदरांत पडेल, अशी तजवीज केली

असावी. वसूल करण्याचे कामीं पुष्कळ कामदार असूं नयेत. कारण वसूल होणारी रकम बऱ्याच अंशीं त्यांच्या पगाराकडे खर्च होऊन, पुन्हा दुसरा नवा कर बसवावा लागेल. व्यापाऱ्याच्या ज्या मालावर कर बसवावयाचा आहे, त्यास वेळोवेळीं मालाची त्रासदायक इयत्ता ठरविणें वगैरेबद्दल अनेक वेळां खेपा घालण्याचा प्रसंग न यावा. कारण असें झाल्यानें व्यापाराची विनाकारण गैरसोय होण्याचा संभव आहे.

याप्रमाणें हे सिध्दांत वाचकांच्या माहितीकरितां देऊन, कराच्या संबंधानें या नियमास अनुलक्षून, आणखी थोडासा जास्त विचार करितों.

**कच्च्या मालावर कर बसविणें गैरसोईचें होतें:-** अडामस्मीथच्या चवथ्या नियमाप्रमाणें कच्च्या मालावर सरकारांनीं जकात बसविणें योग्य होणार नाहीं; परंतु त्यापासून तयार झालेल्या मालावर जकात बसवावी, हेंच सोईचें होतें. कापसावर कर बसवावा असें सरकारास वाटल्यास, कच्च्या कापसावर न बसवितां, त्यापासून तयार झालेल्या कापडावर बसविणें रास्त आहे. कारण त्या कापसाचें कापड तयार होऊन, येईपर्यंत तो पुष्कळ कारागिरांच्या हातीं जातो, त्यामुळें, पहिल्या कारागिरास जी कराची रकम द्यावी लागते, तिचे व्याजासहीत ती तो दुसऱ्या कारागिराकडून घेतो. त्याप्रमाणें होत होत तो सर्व बोजा कापड विकत घेणाऱ्याच्या शिरावर पडतो. म्हणून अडामस्मीथच्या नियमाप्रमाणें कच्च्या मालावर जकात न बसवितां ती तयार झालेल्या कापडावर बसविल्यास गिऱ्हाइकांचा बराच नफा होण्याचा संभव आहे. कारण कापसाच्या अवस्थेपासून कापड तयार होईपर्यंत अनेक कारागिरांकडे तो माल जाण्याचा असल्यानें आरंभींच जर कर बसला, तर आरंभीं बसलेल्या कराच्या व्याजासहीत तो दुसऱ्या कारागिरास द्यावा लागतो. असेंच अखेरच्या कारागिरापर्यंत झाल्यानें व्याजाचा बोजा मोठा वाढतो व तो सर्व गिऱ्हाइकांवर पडतो.

यावरून कच्च्या मालावर जकात न बसवितां पक्का माल

तयार होऊन, विक्रीस तयार झाल्यावर, त्यावर जकात बसविली असतां, विनाकारण बोजा गिऱ्हाइकांवर बसत नाहीं.

**प्राप्तीवरील करः-** ज्याचें दरसाल दीडशें पौंडाहून जास्त उत्पन्न असतें, त्याजकडून सरकार दरपौंडास जी कांहीं रकम घेतें तीस उत्पन्नावरील कर म्हणतात. उत्पन्नावरील कर दर पौंडांस सहा पेन्स असेल तर ज्याचें दरसाल उत्पन्न १००० पौंडांचें आहे, त्यास दरसाल उत्पन्नाच्या कराबद्दल २५ पौंड देणें भाग पडेल. हा कर आरंभीं बसविला, तेव्हां तो निरंतर रहावा असा सरकारचा हेतु नव्हता. यामुळें तो कांहीं दिवसांनीं बंद होईल असें लोकांस वाटत होतें. आतां उत्पन्नावरील कर हा निरंतर असावा, किंवा कांहीं कालपर्यंत असावा, याचा निर्णय करणें अर्थशास्त्रदृष्ट्या मोठ्या महत्वाचें आहे. आणि दुसरा प्रश्न हा कर शाश्वत व अशाश्वत उत्पन्नावर सारखा बसवावा कीं काय? याबद्दल वादविवाद सुरू आहे. प्राप्तीवरचा कर (इनकमट्याक्स) घेण्याची रकमही शाश्वत आणि ठरींव असो, अगर त्याची रकम कांहीं कालपर्यंत चालणारी असो, या सर्व मुद्यांवर त्याचा निर्णय अवलंबून राहतो. पहिल्या मुद्यावर विचार. जर हा कर शाश्वत आणि ठरींव असा असेल, तर सर्व प्रकारचीं उत्पन्नें, (मगतीं शाश्वत असोत अगर अशाश्वत असोत) त्यावर सारखा बसविला पाहिजे जर कांहीं कालपर्यंत हा कर बसवून नंतर बंद करण्याचा उद्देश असेल, तर शाश्वत उत्पन्नापेक्षां अशाश्वत उत्पन्नावर हा कर कमी बसला पाहिजे. याबद्दल उदाहरणें घेऊं.अ नांवाच्या मनुष्याचें जमिनीपासून येणारें उत्पन्न १००० पौंडाचें आहे, व ब हा वैद्यकीचा धंदा करून एक हजार पौंड दरसाल पैदा करितो. म्हणून कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं; अ चें शाश्वत उत्पन्नावर जितका कर आहे, तितकाच ब च्या उत्पन्नावर घेणें गैरवाजवी आहे. कारण जोंपर्यंत ब हा चाकरी करितो, तोंपर्यंत त्यास मदर रकम आदा होणारी आहे. कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, वरील सबबीवरूनच दोघांवर सारखा कर बसावा. असें व्यक्त होतें. ते म्हणतात ज्याचें शाश्वत उत्पन्न आहे, त्यावर हा कर शाश्वत ब-

सेल आणि दुसऱ्याचें उत्पन्न जोंपर्यंत आहे, तोंपर्यंतच बसेल त्यासतें उत्पन्न नाहीसें झालें म्हणजे त्यावरील तो बंद होणार आहे. करितां दोघांवर सारखा बसणें योग्य आहे. हीच गोष्ट जास्त व्यक्त होण्याकरितां दुसरें उदाहरण घेऊं. असें मानू कीं, अ, ब, क, असे तीन पुरुष आहेत. प्रत्येकाजवळ २०००० पौंडांची जिनगी आहे. पैकीं 'अ' नें आपल्या पैशाची दरसाल ५०० पौंड उत्पन्नाची जमीन घेतली, 'ब' नें विमा भरून दरसाल १५०० पौंड तहाहयात मिळावे अशी ठेव घेतली. आणि 'क' नें अशी ठेव घेतली कीं, १० वर्षेपर्यंत दरसाल २५०० पौंड मिळावें. आतां ह्या सर्व वार्षिक मिळकती सारख्या भांडवलापासून मिळतात. आतां ह्यांत अची मिळकत शाश्वत आहे. 'ब' ची त्याच्या हयातीपर्यंत आहे, आणि 'क' ची १० वर्षांनीं बंद होणारी आहे. आतां शाश्वत आणि ठरींव इन्कमटयाक्स बसवावयाचा आहे अशी कल्पना करूं. तर मग 'ब' च्या व 'क' च्या उत्पन्नावरील करापेक्षां 'अ' च्या उत्पन्नावर कर जास्त बसवावा, असें म्हणण्याचें कांहीं कारण रहात नाहीं. जर दर पौंडास ३ पेन्सप्रमाणें कर असेल तर 'अ' चे उत्पन्नावर निरंतर ६ पौंड ५ शिलिंग कर बसेल. 'ब' स १८ पौंड १५ शिलिंग हयातीपर्यंत द्यावा लागेल. आणि 'क' ला ३१ पौंड ५ शिलिंगप्रमाणें १० वर्षें द्यावा लागेल. आतां असें समजूं कीं, हा कर १० वर्षेपर्यंत चालवून, बंद करण्याचा आहे; तर वरील प्रमाणें कर घेणें वाजवी नाहीं. 'अ' ला निरंतर कर असतां जितकी रकम देणें भाग पडलें असतें तितकीच रकम 'क' ला १० वर्षांत पडते. व उत्पन्नावरील कर ठरींव नसून कमजास्ती असतात, तेव्हां अशाच प्रकारची विषमता घडते.

**उत्पन्नावरील कर शाश्वत व ठरींव रकमेचा असेल तर शाश्वत व अशाश्वत अशा दोन्ही उत्पन्नावर सारख्या दरानें बसवावेत.**

जेव्हां उत्पन्नावरील कर हा शाश्वत व ठरींव रकमेचा असतो, तेव्हां शाश्वत व अशाश्वत उत्पन्नावर सारख्या दरानें बसवावा, असा सामान्य नियम केल्यास कांहीं हरकत नाहीं; परंतु जर तो कर

कांहीं कालपर्यंत बसवावयाचा असेल, व तो ठरींव रकमेचा नसेल, तर शाश्वत उत्पन्नावर अशाश्वत उत्पन्नापेक्षां जास्त दरानें बसवावा.

**थोड्या उत्पन्नवाल्यावर त्या कराचा बोजा मोठ्या उत्पन्नवाल्यापेक्षां जास्त पडतो. थोड्या उत्पन्नवाल्यावर या कराचा बोजा जास्त पडतो, सबब अशा उत्पन्नावर कर बसवूंनये अशी कित्येकांची हरकत आहे.**

जर दर पौंडास ६ पेन्स कर बसला तर १०० उत्पन्नावर २ पौंड १० शिलिंग कर बसतो १०००० पौंडांच्या उत्पन्नावर दरसाल २५० पौंड बसतो. १०० पौंडांचें उत्पन्न ज्याचें आहे त्याचे निर्वाहाचे पदार्थ त्यास जेमतेम मिळण्यासारखे असतात. आणि तशांतून जर त्याचे २ पौंड १० शिलिंग करामुळें कमी झाले, तर तितक्यानें त्याची गैरसोय जास्त झाली पाहिजे; परंतु १०००० तून २५० गेल्यानें त्याची फारशी गैरसोय होत नाहीं.

आतां कदाचित् त्या मालकाची गैरसोय झाली, तर त्यास चैनीचे पदार्थ मात्र कांहीं कमी करावे लागतील. यावरून केवळ निर्वाहापुरतें जें उत्पन्न असतें, त्यावर हा कर बसवूंनये असें बेनथाम् याचें मत आहे. आणि ही जी करास अयोग्य अशी रकम ठरेल, ती सर्व उत्पन्नांतून वजा करून जास्त राहिलेल्या रकमेवर कर बसवावा, पहा निर्वाहास लागणारें उत्पन्न अगदीं कमींत कमी १०० पौंडांचें पाहिजे आहे असें धरिलें, तर इतक्या किंवा ह्याहून कमी रकमेच्या उत्पन्नावर हा कर बसवूंनये. १२० पौंडांचें उत्पन्न असल्यास फक्त २० पौंडांवर मात्र कर बसवावा व १००० पौंड उत्पन्न असल्यास ९०० पौंडांवर मात्र कर बसवावा. अशा व्यवस्थेनें प्रत्येकास जास्त असणाऱ्या मासीवर सारख्या मानाचा कर बसवितां येतो. परंतु हल्लीं यांत कांहीं फेरफार करून हा कर बसवितात. १५० पौंडांपेक्षां कमी उत्पन्नावर कर बसवीत नाहींत. आणि १५० पौंडांपेक्षां जास्त उत्पन्न असल्यास त्यांतून १२० पौंड वजा करून बाकी राहिलेल्या उत्पन्नावर कर बसवितात व ही व्यवस्था कदाचित् बेनथाम् यांच्या व्यवस्थेपेक्षां जास्त सोईची आहे असें दिसून येतें.

**उत्पन्नावरील कर हा चैनीचे पदार्थावर बसवावा. अवश्य लागणाऱ्या पदार्थांवर बसवूं नयेः-** जें उत्पन्न केवळ निर्वाहापुरतें आहे, त्यावर कर बसवूं नये; असें पूर्वी प्रतिपादन केलें आहे. प्रत्येकानें आपला निर्वाह भागून जितकें जास्त उत्पन्न होत असेल, त्या मानानें सरकारास उत्पन्नाचा कर द्यावा, असा साधारण नियम सांगितला आहे यावरून अवश्य लागणाऱ्या मालावर कर न बसवितां चैनीचे पदार्थांवर तो बसवावा. ज्यांचें उत्पन्न केवळ निर्वाहापुरतेंच आहे, अशा लोकांना होईल तितका कराचा बोजा कमी करणें हें योग्य आहे, असें जर गृहीत घेतलें, तर या अवश्य लागणाऱ्या मालावर कर बसवून तो जास्त महाग करणें अयोग्य आहे, असें स्पष्ट दिसतें दुसऱ्यापक्षीं गरीब लोकांस लागणारे जे चैनीचे पदार्थ दारू, तंबाकू, गांजा यांवर कर कां न बसवावा? जर गरीब लोकांस निर्वाह भागून चैनीचे पदार्थ घेतां येतात, तर अशा मनुष्यावर कराचा बोजा अगदीं बसवूं नये, हें म्हणणें योग्य नव्हे. अशा लोकांनीं देखील आपल्या उत्पन्नांतून चैनीचे पदार्थ घेतल्यास, त्यांनींही हा कर देणें हेंच योग्य आहे.

---

## भाग ४
## तोंडीधड्याचेंशिक्षण (ओरललेसन्स)

**तोंडीधड्याचेंशिक्षणः-** हल्लीं नवीन सुधारलेल्या इयत्तांप्रमाणें अभ्यास सुरू झाले आहेत. त्यांत तोंडी धड्याचें शिक्षण देण्याचा ठराव झाला आहे. ही फार महत्वाची गोष्ट समजली पाहिजे. अशा शिक्षणापासून ज्ञानवृद्धि, भाषाज्ञान, व चातुर्य ह्या गोष्टी अनायासानें साधणार आहेत. व बहुतेक शाळांवर नवीन पद्धतीनें ट्रेन्ड झालेले अध्यापक नेमिलेले आहेत, त्या अर्थी तोंडी शिक्षणही उत्तम प्रकारें चा-

लून उत्तरोत्तर विद्यार्थवर्गांत जास्त सुधारणा होईल.

तोंडीं धडा चालविण्यासंबंधानें मुख्य व ठळक अशा कोणत्या गोष्टी आहेत, त्या येथें नमूद करून संपत्तिविषयक अर्थशास्त्रसंबंधीं व्याख्या शिकवून दाखवितों.

१ कोणत्याही धड्यास आरंभ करण्यापूर्वी त्याची सर्व सामुग्री जमविणें व पूर्वावलोकन करणें.

२ ज्ञाततत्वापासून अज्ञात तत्वाचें विवरण करणें.

३ शास्त्रीय व बिकट अशा पदार्थांची व्याख्या सुबोध करणें.

४ तात्विकगोष्टी सर्वोत्तरानें ठसविणें.

५. विषयप्रतिपादनांत क्रम व सुबोधता ठेवणें.

६. विषयास अनुसरून मुलांस करमणूक करणें.

७ विषय स्पष्टीकरण मुलांच्या शक्ति तारतम्याप्रमाणें सुलभ करणें.

८ सर्व वर्गांतील मुलांचें चित्त वेधणें.

९ शेवटीं पदन्यूनता पद्धतीनें व प्रश्नोत्तरानें परीक्षा घेणें.

इत्यादि ठळकगोष्टींकडे अध्यापकाचें लक्ष लागलें पाहिजे. म्हणजे अध्यापन हें त्रासदायक न वाटतां आनंदकारक होईल.

जें कांहीं उपयोगी विनिमयार्ह आणि परिमित असतें त्यास संपत्ति असें म्हणतात. ही व्याख्या शिकविणें आहे.

पहिल्यानें एका मुलास उभा करून विचारावें. मुला, टेबल हें काय आहे? उ० एक जिन्नस अथवा पदार्थ आहे. त्याचप्रमाणें बूक हें काय आहे? आंबा हें काय आहे? इत्यादि प्रश्न करून पदार्थ आहेत. अशी उत्तरें द्यावीं. नंतर एकएका मुलाकडून कांहीं पदार्थांचीं नांवें म्हणवून घ्यावीं. नंतर एका मुलाचें आंगावरील धोतर अथवा टोपी काढून त्यास विचारावें, अरे तुला हे जिन्नस कशाला पाहिजेत? हे मी फाडून बाहेर लांब टाकून देतों. छे! छे! मास्तर ते मला आंगावर घ्यावयास पाहिजेत, ते नसले तर मला थंडी वाजेल. बरें

तर हें बूक फाडून टाकूं या. मुलें लागलींच उत्तर देतील कीं, तें आम्हां-
स वाचावयास पाहिजे. बरें ही मजजवळ असलेली फुटकी दौत!! हें तीं
द्या टाकून. कोरे दौत कां टाकावी? व तुमचें धोतर कां नको? मुलें उत्तर दे-
तील कीं; आमचें धोतर उपयोगाचें आहे. तसेंच बूक उपयोगाचें आहे.
परंतु फुटक्या दौतीला कोण विचारितो. तरमग उपयोगी जिन्नस टाकूंनये.
अथवा त्याचा नाश करूंनये असेंच तुमचें म्हणणें कीं नाहीं? मुलें- होय. म-
ग सर्वेत्तिरानें विचारावें आंबा उपयोगी आहे कीं; नाहीं? आहे. घड्याळ उ-
पयोगी आहे. चित्र आहे, अशीं उत्तरें घेतां घेतां उपयोगी नसणाऱ्या प-
दार्थांची नांवें घेतलीं असतां मुलें फसून एकदम आहे असें कदाचित् म्ह-
णतील, मग ते नाहींत अशी त्यांची खात्री करून द्यावी. मग कांहीं मुलां-
कडून उपयोगी पदार्थांचीं नांवें म्हणून घ्यावीं; म्हणजे व्याख्येंतील उपयोगी
पद ठसेल बरें मुला? तें पुस्तक इकडे आण पाहूं. मुलगा लागलीच आणून
देईल. अरे हें पुस्तक जसें दिलेंस तसेंच ही लेखणी तुला देतां येई-
ल कीं नाहीं? उ० येईल. ठीक आहे, तुम्ही चांगलीं उत्तरें देतां. बरें, हा फ-
ळा देतां येईल कीं नाहीं? उ० छे मास्तर तोमला उचलावयाचा नाहीं. बरें चार
मोठीं माणसें देऊं शकतील कीं नाहीं? उ० देतील अथवा घेतील. ठीक आहे
आंबे देतां घेतां येतील कीं नाहीं? उ० येतील. बरें फणस? येतील. आणिज-
मीन? छेछे! ती कोठची उचलते. ती नाहीं देतां घेतां येणार. मग स्टांपा-
वर लिहून वगैरे देऊन देतां घेतां येते, अशी त्यांची समजूत करून द्या-
वी. ह्याप्रमाणें बऱ्याच वस्तूंचीं उदाहरणें देऊन, देतां घेतां येणाऱ्या पदा-
र्थांविषयीं समजूत करून द्यावी. नंतर कांहीं मुलांकडून देतां घेतां ये-
णारे पदार्थ बोलवावे. मग सांगावें इतका वेळ (देतां घेतां येणारे पदार्थ, देतां घे-
तां येणारे पदार्थ) असें मी म्हणत होतों; त्यांस एक नांव आहे तें सांगूं काय?
नीट लक्ष द्या. त्यास विनिमयार्ह पदार्थ असें म्हणतात. विनिमयार्ह कशास
म्हणतात? उ० देतां घेतां येणाऱ्या पदार्थास. ह्या प्रमाणें पदन्यूनता पद्धतीनें वा-
क्य पुरें करून व्याख्येंतील विनिमयार्ह यापदाची चांगली समजूत करून द्यावी.

बरें मुलांनो तुम्ही मंडई पाहिली आहे काय? उ० होय पाहिली
आहे. तेथें कायकाय येतेंरे? उ० पेरू, द्राक्षें, नारळ, केळीं, बोरें, [illegible]
बरें तुम्हांस विचारितों पैशाला द्राक्षें किती येतात? उ० दोन. अथवा तीन, आ

णि बोरें? मुलें उत्तर देतील तीं काय ढेरभर येतात. म्हणजे किती? १० होय? छे छे! मास्तर १०कां १५० सुद्धां येतील? अरे द्राक्षें कमी आणि बोरें फार कां मिळतात, हें कोणास ठाऊक आहे? एखादा मुलगा उत्तर देईल द्राक्षें गोड असतात. पण बोरें तितकीं गोड नसतात. ठीक आहे द्राक्षांपेक्षां गूळ गोड असून त्याचा एवढा मोठा खडा येतो, असें होतेंना? अशा हरतऱ्हेच्या अडचणी आणिल्या असतां कोणाच्या तरी मनांत येईल, कीं द्राक्षें कमी सांपडतात. व बोरें पुष्कळ सांपडतात. नंतर त्याप्रमाणेंच सोनें पुष्कळ सांपडतें कां कमी; हवा कशी सांपडते. लोखंड कसें सांपडतें? पाणी कसें सांपडतें? अशा प्रकारचीं उदाहरणें घेऊन पुष्कळ सांपडणारे व कमी सांपडणारे पदार्थ त्याबद्दल समजूत करून द्यावी. व पुष्कळ सांपडणाऱ्या पदार्थांस आम्हीं अपरिमित असें म्हणतों, असें त्यांस सांगावें. प्रश्नः- अपरिमित कशास म्हणतात उ० पुष्कळ सांपडणाऱ्या पदार्थांस. नंतर विचारावें, अज्ञान त्याच्या उलट काय? उ० ज्ञान. तसेंच अशिक्षित त्याच्या उलट शिक्षित. इत्यादि प्रश्न करून निषेधार्थ अथवा उलट अर्थ सुचविणें झाल्यास त्यामागें अ लावितात, हा नियम सांगावा. आतां सांगा तर अपरिमित त्याच्या उलट काय? उ० परिमित, परिमित कशास म्हणतात? कमी सांपडणाऱ्या पदार्थांस. आणि पुष्कळ सांपडणाऱ्यास काय म्हणतात? उ० अपरिमित. त्याप्रमाणें उलटसुलट प्रश्न करून धडा ठसवावा. नंतर मुलांस थोडा व्यायाम देऊन त्यांस ताजीं तवानीं केल्यावर विचारावें, (एकाद्या मुलास पुढें आणून) तुझें नांव काय? उ० माझें नांव कृष्णा. बरें मुलांनों जरमी त्याला ५०० मनुष्यांत दडवून ठेविलें तर तुम्हीं हुडकून काढाल काय? होय मास्तर काढू. अरे कसारे काढशील? म्हणून एकास विचारितांच तो सांगेल कीं त्याच्या खुणा व चेहरा माझ्या लक्षांत आहे त्या कोणत्या सांग पाहू? काळा, तांबडा रुमालवाला, सरळ नाकाचा, मोठ्या डोळ्यांचा इ० शाबास! त्याप्रमाणें बरेच प्रश्न करून सांगावें, मुलांनों आमची एक वस्तु गेली आहे. ती आम्हांला द्याल कां हुडकून? उ० ती कसली आहे तें सांगा? म्हणजे देऊं. ठीक आहे. लक्ष्य द्या बरें कां? ती कां नाहीं परिमित आहे, उपयोगी आहे, व विनिमयार्ह आहे. खरें, परंतु तिचें नांव काय? तें मी सांगतों विसरू नका हो! नाहीं नाहीं मास्तर सांगा? ठीक आहे तिचें नांव संपत्ति. कोणाचें नांव संपत्ति? उ० जें कांहीं परिमित इत्यादि.

जे कांहीं परिमित त्यास काय म्हणतात? उ० संपत्ति.अशा क्रमानें ह्याच्या ठसल्यावर मग घोडा, फळा, फूल, बूक व हवा, ह्यांतून कोणास संपत्तीचे लक्षण लागूपडतें वगैरे बद्दल खात्री करून घेऊन, धडा पुरा करावा.

# अर्थशास्त्र.

## पांचव्या पुस्तकांतील किमतीविषयीं धडा शिकविण्याचीं टिपणें (नोटस्).

१ व्यवहारामध्यें नाण्याची आवश्यकता कशी उत्पन्न होते, हें प्रथमतः मुलांच्या मनांत आणविणें.

२ नाणें पाडण्यास कोणत्या गोष्टीची जरूरी आहे, म्हणजे ज्या वस्तूंचें नाणें बनवावयाचें त्यांत कोणत्या सोई असल्या पाहिजेत, हें समजावून देणें.

३ मग त्या सोई धातूं पैकीं कोणत्या धातूंतून असतात, हें काढून घेणें;न आल्यास सांगणें; (ह्या धडा ज्यांना शिकवावयाचा असतो. त्यांना धातु म्हणजे काय? हें पूर्व शिक्षणांतच माहीत झालेलें असतें.)

४ दुसऱ्या कलमाचें येथें स्पष्टीकरण पुनः करण्याचें योजून, त्यापुढें ' वस्तूस अवकाश थोडा पुरून, किंमत फार येणें. या गोष्टींची आवश्यकता मुलांचे अंतःकरणांत उत्पन्न करून,हळू हळू सोनें व रुपें या धातूंकडे वळून, यावरील विवेचनास कितपत सोईच्या आहेत हें त्यांच्या मनांत बिंबवणें.

येथवरचे ४ प्रश्न उपोद्घाताद्दाखल आहेत. सदरहू प्रश्नाच्या उद्घाटनानें मुलांच्या ध्यानांत इतकें तरी निदान भरेल कीं, लोखंड वगैरे धातूंपेक्षां सोनेंवरुपें यांस किंमत अधिक पडते, हा विचार मनांत आणून दिला म्हणजे या धड्या संबंधानें मुलांच्या मनांत विचार घोळूं लागतील, व पुढील मार्ग सुलभ होईल.

### किंमतीविषयीं.

५ अमुक एकादा पदार्थ मिळण्याविषयीं तो पदार्थ ज्याजवळ असेल, त्याला द्रव्यरूपानेंजेंकांहीं द्यावें लागतें, ती किंमत होय.

हें मुलांस समजावून देऊन, मग त्यांनां प्रश्न करावा कीं; 'पदार्थाला जी किंमत पडते, ती काय म्हणून?

६. वरील प्रश्नास 'त्याचा उपयोग होतो म्हणून' असें उत्तर येईल. तसें आल्यावर त्यांस आपण सोन्यारुप्यापेक्षां लोखंडाचा किती तरी अधिक उपयोग करितों; हें स्पष्ट करून द्यावें. येथें त्यांचा गोंधळ होईल. मग पुनः विचारावें ' उपयोग फार असला, म्हणजे पदार्थास किंमत पडते काय?'

७ वरील प्रश्नावर त्यांनां उत्तर देतां येणार नाहीं. मग आपणानुसत्या उपयोगींच नव्हेत परंतु अत्यंत आवश्यक अशी हवा व पाणी, याविषयीं सांगावें. व त्यांची अत्यंतावश्यकता व निर्मूल्यत्व त्या पुढें व्यक्त करावें.

८ या गोष्टीवर कोणीं मुलांनीं शंका काढिली, तर बरेंच. नाहीं काढिल्यास आपणच ' कोठें कोठें पाणी व हवा यांस किंमत पडत असते.' या वैकल्पिक गोष्टींचें विधान करून, त्याविषयीं प्रतिपादन करावें; व तसें तें करीत असतां त्यांत सिद्ध करावें कीं, 'पदार्थाची कमताई ' असल्या वांचून नुसत्या उपयोगानें किंमत पडत नाहीं.

९ पुनः ' जेथें त्या पदार्थाची कमताई असते, तेथें त्याच्या विपुलत्वस्थानच्या किंमतीहून त्यास फारच अधिक किंमत पडते,' हें सिद्ध करून द्यावें.

१० वरील सिद्धतेच्या पुष्टीकरणास ' कित्येक ठिकाणीं एका लोखंडाच्या खिळ्याला मेंढरासारखें जनावर येतें ' या गोष्टीचें प्रतिपादन योग्य होय. म्हणून तसें करून त्याच्या योगानें कमताईचा किंमतीशीं संबंध मुलांचे ध्यानीं आणून द्यावा.

११ मग पुनः प्रश्न करावा कीं, लोखंडाहून सोन्यास अधिक मोल कां? यावर त्यांना 'उपयोग व कमताई ' हीं उत्तरें देतां येतील, तीं घेऊन पुढील प्रश्न करावा.

१२ 'उपयोग व कमताई' या दोहोंपैकीं एकेका पदार्थास एकेकच गोष्ट किंवा धर्म अनुकूल असेल, म्हणजे एक पदार्थ उपयोगीं आहे, परंतु त्याची कमताई नाहीं; व दुसऱ्या एकाची कमताई आहे; परंतु त्याचा उपयोग नाहीं; तर त्यास किंमत येईल काय? या मुद्यांवर त्यां-

ची उत्तरें घेऊन, या दोन्ही गोष्टीची त्यांच्या मनांत योग्य भासवून द्यावी. खालील उदाहरणें हें समजाविण्यास उपयोगी पडतील.

१३ उपयोगावरच केवळ किंमत नाहीं. यास प्रकाश, हवा, पाणी हीं उदाहरणें योग्य होत. नुसत्या कमताईवर किंमत अवलंबून नसते. या गोष्टीच्या सत्यतेस 'कोणा एका दूरवरच्या देशांत क्वचित् स्थळीं सांपडणाऱ्या दगडाचें उदाहरण द्यावें, व ज्याचा उपयोग कांहीं नाहीं परंतु दुर्मिळ मात्र आहे, अशास किंमत पडेल काय हें सांगणें.

१४ वरील तत्वें त्यांच्या मनांत ठसलीं, असे झाल्यावर 'उपयोग या शब्दाचें थोडें अधिक स्पष्टीकरण करावें, व त्यांत 'शोभादायक व टिकाऊ असे पदार्थ मिळण्याची इच्छा तृप्त करणें' या गोष्टींचा अंतर्भाव करावा, व मग नील, पाच, पुष्पराग, हिरा, या रत्नांविषयीं सांगावें कीं, अवतरणांतर्गत कथन यांस सर्वस्वी लागू आहे. व शिवाय व्यवहारांतही कांहीं प्रसंगीं असें 'कांच कापण्यास हिरा' या प्रमाणें यांचा उपयोग होतो, म्हणून यांस किंमत पडते.

१५ वरील कलमांत 'टिकाऊ' हा विशेष धर्म स्पष्ट होण्यास त्याच्या अभावीं 'फुलांचा सुंदरसा गजरा लोकांस मिळण्याची उत्कट इच्छा असून, हिरे वगैरेच्या लक्षांशानेंही पण किंमत पडत नाहीं.' याविषयीं सांगावें, व १४।१५ या कलमांतील प्रतिपादनाचा 'उपयोग यांतच समावेश होतो हें सांगावें.

१६ येथवर २ तत्वें मुलांस समजलीं तीं हीं 'उपयोग व कमताई' हीं पदार्थांस असल्यावर त्याला किंमत येते. मग त्यांनां आरोग्याविषयीं प्रश्न करावा कीं, हे दोन्ही धर्म आरोग्यास लागू असून त्याला किंमत पडत नाहीं. १०।५ हजार किंवा जास्त कमी कां होईना रुपये देऊन आरोग्य कोठें मिळत नाहीं, म्हणून त्यास किंमत कां नाहीं? याजवर पदार्थांत 'देतां घेतां येणें' किंवा ज्याला विनिमयार्हत्व म्हणतात, तो धर्म असला पाहिजे, या विषयीं सांगावें.

१७ आतां एकंदर ३ धर्म झाले व ज्या तिहींच्या अभावीं पदार्थांस किंमत येणार नाहीं हें मुलांस सहज समजल्यानंतर जीं ३ मूल तत्वेंच आहेत तीं त्यांच्या मनात चांगलीं ठसलीं म्हणजे त्यावर अधिक विचार

करण्यास बरें.

---

## पांचव्या पुस्तकांतील वेतनाविषयींच्या धड्याचीं टिपणें (नोटस्)

१ वेतन म्हणजे काय हें सांगणें.

२ रोजमुरा कोणते लोक मिळवितात हें सांगणें.

३ कामकरी लोकांपासून काम करवून घेऊन, त्याजबद्दल आपण त्यांस जें देतों, त्यास रोजमुरा म्हणतात, अशी व्याख्या सांगणें.

४ कामकरी लोकांस जर आपण रोजमुरा दिला नाहीं, तर काय परिणाम होईल? ते लोक काम करणार नाहींत. यामुळें श्रीमंत लोकांस आपलीं कामें स्वतः करावीं लागतील. शिवाय कामकरी लोक निरुद्योगी होतील. देशांत लोक निरुद्योगी राहणें हें अर्थशास्त्र दृष्टीनें फार वाईट आहे, वगैरे बद्दल समजूत करून देणें.

५ आतां श्रीमंत लोक जर आपापलीं किरकोळ कामें करूं लागतील, तर महत्वाच्या कामाकडे त्यांचे श्रम कमी होतील, यामुळें देशाची संपत्ति वाढणार नाहीं; हा मोठा तोटा आहे असें सांगणें.

## वेतन कमजास्त मिळण्याचें कारण.

६ कांहीं कामकरी लोकांस वेतन कमी मिळतें, व कांहींस जास्त मिळतें, हें श्रमावर अवलंबून नसतें, सहजच तुम्हीं म्हणाल कीं, जसे जास्त श्रम करावे, तसें वेतनही जास्त मिळणार आहे. परंतु हें श्रमावर अवलंबून नाहीं. उ० कामकरी लोक व घड्याळें नीट करणारे लोक यांची हकीगत सांगून हें सिद्ध करणें.

७ अर्थशास्त्रांत पदार्थाला किंमत पडण्याचीं जी कारणें आहेत, तीं कारणें पदार्थाच्या अंगीं- उपयोगीपणा, संचय वगैरे जसे गुण असतील त्या प्रमाणें वगैरेची बरीच माहिती सांगून चांगली वठेल असें करणें.

८ कामकरी लोक कमी असले, तर वेतन जास्त मिळतें. तसेंच जास्त असले, तर वेतन कमी मिळतें; याविषयीं कामकरी लोक व घड्याळें नीट करणारे लोक यांचीं उदाहरणें देऊन अर्थ स्पष्ट करणें.

९ मजुरांपेक्षां घड्याळें नीट करणाऱ्या लोकांची संख्या कमी अ-

सते, याचें कारण काय?

१० मजूर तयार होण्यास खर्चाचें काम नाहीं. घड्याळें नीट करणारे लोक तयार होण्यास फार खर्चाचें काम आहे. शिवाय वेळही फार लागतो. यामुळें घड्याळें नीट करणारे वगैरे असल्या प्रकारचे लोक कमी तयार होतात. म्हणून त्यांस वेतन जास्त मिळतें. उ० सुतारानें माच्याचा पाय नीट केला, आणि वैद्यानें रोग्याचा पाय बरा केला, तर वेतन जास्त कोणास मिळेल. व तें कां याचें कारण कलम ११ त आहे

११ वैद्य वगैरे लोक तयार होण्यास पैसा फार लागतो म्हणून लोक त्यास जास्त वेतन देतात, असा अर्थ नाहीं. तर वरील प्रकारचे लोक तयार होण्यास पैसा फार लागतो; म्हणून ते लोक कमी निपजतात. म्हणून त्यांस जास्त वेतन द्यावें लागतें.

१२ जास्त वेतन मिळण्यास दुसरें कारण— त्या कामांत त्याची गति चांगली असावी. उ० चांगला चितारी व मध्यम चितारी तयार होण्यास जरी खर्च व वेळ सारखा लागला. तरी चांगला चितारी मध्यम चिताऱ्यापेक्षां जास्त वेतन मिळवितो, वगैरे विषयीं माहिती सांगून वरचेवर सांगितलेल्याची परीक्षा घेऊन धडा पुरा करावा.

**अर्थशास्त्राचा अभ्यास निरर्थक आहे काय? —** ज्या शास्त्रापासून संपत्तीचें उत्पादन, व्यय वगैरे वाचकांस यथार्थ समजल्यानें विनाकारण देशांतील होणारा संपत्तीचा दुर्व्यय बंद होऊन, सर्व देशाची संपत्ति वाढेल, व त्या देशाची भरभराटी होईल. देशांतील मजुरांची स्थिति सुधारत जाईल, व्यापाराची वृद्धि होत जाईल. व्यापार श्रेणि म्हणजे काय व त्याची रचना कशी असावी, पतीपासून होणारीं कार्यें देशाच्या भरभराटीस कशी कारणीभूत होतात. व पतीची वृद्धि पाश्चिमात्य राष्ट्रांत झाल्यानें पेढ्या वगैरे स्थापन होऊन देशांतील सर्व भांडवलाचा संपत्युत्पादनाचे कामीं कसा उपयोग होतो? व तशा साधनाचा अभाव आमच्या देशांत आहे, तो दूर होऊन देशांत पत वाढण्याचे इलाज जिकडे तिकडे सुरू झाल्यास भांडवल वाढेल व पाहिजे तीं कामें सुरू करण्यास सर्व देश समर्थ होईल. इत्यादि महत्वाच्या गोष्टी ज्या शास्त्रापासून समजतात त्या शास्त्राच्या अध्ययनापासून किती फायदे होतील हें या लहानशा ग्रंथांत पूर्णपणें सांगणें अशक्य आहे. सबब का-

कारखान्यांत वर दाखविलेल्या नमुन्यानें अगर अन्यप्रकारें तोंडीं धड्याचें शिक्षण देऊन, या महत्वाच्या शास्त्राचा फैलाव जितका होईल, तितका करण्याविषयीं प्रत्येकानें झटावें. ॲंग्लोव्हर्न्यांक्युलरस्कूलमध्यें मराठी वाचण्यासाठीं जीं अन्य कांहीं करमणुकीचीं पुस्तकें ठेवितात, त्या ठिकाणीं ह्या किंवा अशा प्रकारच्या पुस्तकांचा उपयोग व्हावा. म्हणजे पुढें जसजसा त्यांचा इंग्रजी अभ्यास वाढेल, तसतशी या शास्त्राविषयीं आगाऊच जिज्ञासा वाढलेली असल्यानें पुढें त्यांस अधिक ज्ञान संपादन करण्याची संवय लागेल. व या शास्त्राचें ज्ञान वाढल्यापासून पाश्चिमात्य राष्ट्राप्रमाणें या देशाचाही उत्कर्ष होईल. म्हणून ह्या शास्त्राचें अध्ययन निरर्थक आहे, हें म्हणणें चुकीचें ठरतें.

---

# शुद्धिपत्र.

| पृष्ट. | ओळ | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ९ | १८ | साराश. | सारांश. |
| १० | १ | पुकळ | पुष्कळ. |
| ११ | ६ | सपत्युत्पत्ति | संपत्त्युत्पत्ति. |
| ११ | १० | अर्थशास्त्रानभिज्ञास. | अर्थशास्त्रानभिज्ञांस. |
| १२ | १४ | संवारूप. | सेवारूप |
| १४ | २२ | न्हेणें. | नेणें. |
| १५ | १० | वस्त्रं | वस्त्रें. |
| २१ | २८ | 'क्ष' नें 'ज्ञ'पासून | 'ज्ञ'नें 'क्ष'पासून. |
| २६ | १६ | देशां | देशांत |
| ५० | १ | विनियम | विनिमय. |
| ५४ | २६ | तात्पय | तात्पर्य. |
| ६४ | २६ | नुकसाने | नुकसान. |
| ७६ | १४ | मनुसतृतीत | मनुस्मृतींत. |
| ७८ | २८ | एवजानें | ऐवजानें. |
| ८७ | ११ | पाठविण्या | पाठविण्याचा |
| ९३ | १ | मिळण्याचे | मिळण्याचे |
| १०० | १४ | लोक्यांस | लोकांस |
| १०६ | ६ | राष्टीय | राष्ट्रीय. |